# मराठी नाट्यकथा

लेखक : वि. द. साठे

प्रस्तावक : आचार्य भागवत



दर्पदमन-सामर्थ्याची वृद्धि करणारा जो अग्नि त्याची भक्तजनांनी वेदीवर संस्थापना केली आहे. त्यास हवि अर्पण करून आम्हीहि त्याला प्रकट व्हावयास लावूं. हे सत्पतिपालका अग्निदेवा, पराक्रमाच्या कृत्यांत आमचा तूं प्रसन्न अंतःकरणानें संरक्षणकर्ता हो. —ऋग्वेद

मङ्गल साहित्य प्रकाशन, पुणें ४

# प्रस्तावना

*" I am convinced that fine art is the subtlest, the most seductive, the most effective instrument of moral propaganda in the world, excepting only the example of personal conduct, and I waive even this exception in favour of the art of the stage, because it works by exhibiting examples of personal conduct made intelligible and moving to crowds of unobservant unreflecting people to whom real life means nothing. I have pointed out again & again that the influence of the theatre in England is growing so great that private conduct, religion, law, science, politics, and morals are becoming more and more theatrical, whilst the theatre itself remains impervious to common sense, religion, science, politics, and morals. "*

**Bernard Shaw**

**[ From the preface to 'Mrs. Warren's profession' ]**

' मराठी नाट्यकथा ' ह्या अभिनव पुस्तकाचा पुरस्कार करितांना मला विशेष आनंद वाटत आहे. या पुस्तकाचे लेखक श्री. वि. द. साठे हे अनुभवी शिक्षक असून त्यांनीं अध्यापनशास्त्राचाहि अभ्यास केलेला आहे. नाट्य-वाङ्मयाचा त्यांचा व्यासंग बरींच वर्षे चालला असून मराठी रंगभूमीचें विशेष संशोधन अलीकडे त्यांनीं हातीं घेतलें आहे. अशा अधिकारी [illegible] विद्यार्थी-वर्गासाठीं विशेष हेतुपूर्वक निर्माण केलेल्या या पुस्तकामुळें मराठींतल्या शिक्षण-साहित्यांत चांगल्या प्रकारची भर पडणार आहे. शिक्षणाच्या पुनर्घटनेच्या या काळांत ज्या विविध अंगांचा शिक्षणांत समावेश करणें अत्यंत आवश्यक आहे त्यांत नानाविध कलांचा अंतर्भाव केला पाहिजे असें माझें स्वतःचें मत आहे. उपयुक्तता आणि कला यांची शिक्षणांत फारकत झाल्यामुळें जीवनांतहि त्यांची फारकत झालेली आढळून येते. वस्तुतः उपयुक्तता आणि कला हीं कांहीं अलग राहूं शकतील अशीं जीवनाचीं अंगें नाहींत. एका संपूर्ण जीवनाचीं तीं परस्पर उपकारक अशींच मूल्यें आहेत. परंतु जीवनाच्या तत्त्वज्ञानांत तशी मान्यता न मिळाल्यामुळें तीं वियुक्त झालीं आहेत. वियुक्त झाल्यामुळें त्यांच्यांत

विरोधहि माजला आहे. हा विरोध नाहींसा केल्याशिवाय जीवनाची सर्वांगीण उन्नति होणार नाहीं. सध्यां जीवनांत उपयुक्ततावादी आणि कलावादी असे विरोधी पक्ष निर्माण झाले आहेत. ह्या पक्षांनीं विचारांचा गोंधळहि वाढविला आहे. हा गोंधळ दूर करण्यासाठीं एका नव्या तत्त्वज्ञानाची अथवा नव्या जीवनदर्शनाची आवश्यकता उत्पन्न झाली आहे. या दर्शनानें उपयुक्ततेचा कलेशीं आणि कलेचा उपयुक्ततेशीं आंतरिक संबंध जाणला पाहिजे. आणि त्यांच्यामध्यें सलोख्याचे, सहकार्याचे आणि प्रेमाचे संबंध प्रस्थापित केले पाहिजेत. तरच उपयुक्ततेला सौंदर्य लाभेल आणि सौंदर्य निष्प्राण होणार नाहीं. जीवन म्हणजे केवळ जगणें नव्हे, ढोरासारखें राबणें नव्हे. ती केवळ यांत्रिक क्रिया झाली. जीवनांत ज्ञान, सौंदर्य, मांगल्य यांच्या अनुभूति प्रगट झाल्या पाहिजेत; तरच तें जिवंत ठरेल. जीवनाला जिवंतपणा देण्याचें कार्य कलेला करावयाचें असतें. म्हणून जीवनाच्या सर्व क्षेत्रांत कलेनें प्रवेश केल्याशिवाय तें प्राणयुक्त बनणार नाहीं. असें जीवन समाजांत तयार करण्यासाठीं एका नव्या शिक्षणशास्त्राची आवश्यकता आहे. त्या शिक्षणशास्त्रानें उपयुक्तता आणि कला यांचा समन्वय साधला पाहिजे. असें नवें शिक्षणशास्त्र आपल्या देशांत निर्माण होण्याचा काळ आतां आला आहे अशी माझी समजूत आहे. नाट्याची अथवा रंगभूमीची कला ही सामाजिक जीवनावर परिणाम घडवून आणण्याच्या दृष्टीनें सर्व कलांत अग्रगण्य आहे असें प्राचीन काळापासून मोठमोठे विचारवंत मानीत आले आहेत. जीवनाचा जिवंत आदर्श आपल्या स्वतःच्या चरित्रानें समाजापुढें मांडणाऱ्या विभूतींचा अपवाद वगळल्यास नाट्यकलेइतकें जनमनाचीं पकड घेणारें दुसरें समर्थ तंत्र आढळत नाहीं असें बर्नार्ड शॉ यानेंहि म्हटलें आहे. **नाट्यं भिन्नरुचेर्जनस्य बहुधाप्येकं समाराधनम्।** ('मालविकाग्निमित्र' अंक १ ला) या कालिदासाच्या वचनांतहि नाट्याची ही अलौकिक आकर्षकता मान्य केलेली आढळते. 'काव्येषु नाटकं रम्यम्।' हा संस्कृत नाट्यरसिकांचा अभिप्रायहि याच अर्थाचा आहे. हें सारें सामर्थ्य केवळ करमणुकीसाठीं वायां घालविणें ह्यासारखा दुसरा समाजद्रोह होऊं शकणार नाहीं. नाट्याचें हें सामर्थ्य समाजमानसाला एका व्यापक अर्थानें सुशिक्षित करण्यासाठीं वापरलें

पाहिजे. आणि याच दृष्टीनें ह्या कलेचा शिक्षणांत आरंभापासूनच समावेश होण्याची आवश्यकता आहे.

अगदीं लहान वयापासून मुलांच्या अंगीं नाटयप्रवृत्ति असलेली दिसून येते. यांत अनुकरणाचा भाग बराच असला तरी आत्मप्रकटनाचा भागहि थोडा फार असतोच. शिक्षणशास्त्रानें मुलांच्या या स्वाभाविक प्रवृत्तीचा चांगला अभ्यास करून तिचा विकास घडवून आणिला तर मुलांच्या जीवनाला निरामय क्रीडेबरोबरच निर्मितीचें सामर्थ्यहि मिळवून देतां येईल. नाटयकलेच्या उपासने-मध्यें सृष्टिनिरीक्षण, मानवस्वभावपरीक्षण यांचा अभ्यास अपरिहार्यतेनें येतोच. भाषा, वक्तृत्व, अभिनय, नृत्य, चित्र, शिल्प, काव्य, संगीत यांचाहि नाटय निर्मितीसाठीं स्वीकार करावा लागत असल्यामुळें या सर्व कलांचें विकसन नाटय-कलेच्या अनुषंगानें होऊं शकतें. कल्पनाशक्तीचा विकास करण्याचें साधन या दृष्टीनें तर नाटयाला विशेषच महत्त्व आहे. आजचें आपलें शालेय शिक्षण निष्क्रिय, केवळ बुद्धिप्रधान आणि केवळ शब्दगंठित झालेलें आहे. यामुळेंच तें निर्जीव बनलें आहे. विद्यार्थ्यांची निर्माणशक्ति जागृत करण्याचें कार्य त्याला साधत नाहीं तेंहि यामुळेंच. जाणणें ही कांहीं अमूर्त, संबंधरहित प्रक्रिया नाहीं. तिचा करण्याशीं, जीवनांतील विविध शारीरिक व्यापारांशीं निकटचा संबंध असतो. जाणलें कीं तें कृतीच्या द्वारें व्यक्त होण्यासाठीं धडपडूं लागतें. कृतीच्या द्वारां पुन्हां नव्या जाणीवा निर्माण होतात. असा जाणण्या-करण्याचा नित्यसंबंध आहे. नाटयकलेंत हा संबंध अतिशय चांगल्या रीतीनें विशद होत असल्यामुळें विद्यार्थ्यांच्या शिक्षणांत या कलेला विशेष प्राधान्य मिळालें पाहिजे. विद्यार्थ्यांनीं आपलें सारें ज्ञान नाटयकलेंत परिणत करण्याची संवय लावतां आली तर त्यांचें ज्ञान आणि त्यांचें जीवन हीं दोन्हीं जिवंत होतील. शिक्षण-शास्त्राचा अलीकडे नाटयाशीं घरोबा वाढत आहे. ही घटना स्वागतार्ह आहे असें मी मानितों. साम्यवादी रशियाच्या नव्या शिक्षणपद्धतींत नाटयाला आणि रंगभूमीला मानाचें स्थान देण्यांत आलें आहे या गोष्टीचाहि आमच्याकडील शिक्षणशास्त्रज्ञांनीं विचार करण्यासारखा आहे.

श्री. वि. द. साठे यांचें प्रस्तुत पुस्तक लँबच्या Tales from

Shakespeare ' सारखें भासलें तरी त्या पुस्तकासारखें निव्वळ बालवाचकांसाठीं लिहिलेलें नाहीं. मुख्यतः मराठी भाषेच्या प्रौढ विद्यार्थ्यांसाठीं याची रचना करण्यांत आली आहे. नाट्य हा एक कथाप्रकार आहे. रंगभूमीवर कथा अभिनयाच्या द्वारां वर्तविली कीं तिच्यांत श्राव्य आणि दृश्य भागांची भर पडते. परंतु नाटकांतील कथा प्रेक्षकाला आपल्या कल्पनाशक्तीच्या साहाय्यानें परिपूर्ण करून घेऊन जाणावी लागते. प्रस्तुत पुस्तकांत नाट्याचे गुण शक्य तितके कायम राखून कथा सांगण्यांत आल्या आहेत. नाट्याचा श्राव्य व दृश्यभाग परिशिष्टें व प्रस्तावना यांच्या रूपानें पुरविण्यांत आला आहे. यामुळें या कथांच्या वाचनानें मराठी रंगभूमीची विद्यार्थ्यांना बरीच कल्पना येईल. प्रत्यक्ष प्रयोग पाहाण्याची व करण्याची इच्छा त्यांच्यामध्यें उत्पन्न होईल. या पुस्तकांत मराठी रंगभूमीची अगदीं प्रारंभापासून आजतागायत कशी वाढ होत आली याचें सुसंगत चित्रण व मार्मिक विश्लेषण असल्यामुळें जाणत्या वाचकांना देखील याची उपयुक्तता वाटेल असा मला विश्वास वाटतो. रंगभूमीवर सामाजिक जीवनाचींच चित्रें प्रतिबिंबित होत असल्यामुळें ह्या पुस्तकाच्या परिशीलनानें महाराष्ट्राच्या गेल्या शंभर वर्षांतील सामाजिक जीवनाचा आढावा वाचकांना मिळणार आहे.

मराठी रंगभूमीचा आणि नाट्यवाङ्मयाचा सामान्य जनतेंत प्रसार करण्याच्या दृष्टीनें या पुस्तकाचा चांगला उपयोग होईल. नाट्यवाङ्मयच काय पण सर्वच वाङ्मय सुबोध कथारूपानें समाजाला देण्याची गरज लोकशाहीच्या नव्या युगांत सतत भासणार आहे. नानाविध देशांतील नानाविध भाषांचें साहित्य आपल्या समाजाला पुरविलें पाहिजे. सध्यांच्या गर्दीच्या जीवनांत मूळ मोठे ग्रंथ वाचण्यापेक्षां ते सारांशरूपानें वाचणें जास्त सोयिस्कर पडेल. इंग्रजींतलें **Readers digest** सारखें बेसुमार खपाचें मासिक केवळ मोठ्या लेखांचा सारांश देत असतें. ह्याच पद्धतीवर तिकडे Omni-Book, Coronet हीं मासिकें अलीकडे निघालीं आहेत. नवीन प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांचे सारांश गोष्टरूपानें देऊन तीं त्यांच्या लोकप्रियतेस मदत करितात. '**Worlds famous Books in outline**', '**The World's Heritage**' यांसारख्या ग्रंथांतून विश्वसाहित्याचा सुलभ परिचय करून देण्यांत येत असते.

Strand सारखीं लोकमान्य मासिकें तर शेक्सपिअर-डिकन्ससारख्या लेखकांच्या नाटक-कादंबऱ्या कथारूपानें मोठमोठ्या लेखकांकडून मुद्दाम लिहवून छापीत असतात. विन्स्टन् चर्चिलनें सुद्धां एकदां Strand साठीं शेक्सपिअरची Julius Caesar ची कथा लिहून दिली होती. ( The Strand Magazine, नोव्हेंबर १९३३ ) मराठीमध्येंहि असे प्रयत्न चालले आहेत. संस्कृत नाटकांच्या सुबोध कथा सांगण्याचे तीन-चार प्रयत्न आतांपर्यंत झाल्याचें आढळतें. प्रा. फडक्यांच्या ' मनोहरची आकाशवाणी ' या पुस्तकांत कांहीं चांगल्या पाश्चात्य कादंबऱ्यांचीं कथानकें त्यांच्या रसग्रहणासह दिलीं आहेत. प्रा. के. ना. वाटवे यांनीं ' संस्कृत काव्याचे पंचप्राण ' या आपल्या नव्या ग्रंथांत संस्कृतांतील प्रसिद्ध पंचमहाकाव्यांचा परिचय मराठी वाचकांस घडविला आहे. श्री. साठे यांचें प्रस्तुत पुस्तक या दृष्टीनें सामान्य मराठी वाचकांनाहि उद्बोधक होईल अशी मला आशा आहे.

यापुढें आपल्या देशांत मराठीच्या अभ्यासाला वाढती प्रतिष्ठा प्राप्त होणार आहे. प्राथमिक शिक्षकांचीं अध्यापनमंदिरें, विद्यापीठाच्या प्रवेशपरीक्षेचे अथवा विद्यापीठाच्या प्रथम वर्षाचे वर्ग यांतील विद्यार्थ्यांना पुरवणी-वाचन किंवा पाठ्य-पुस्तक म्हणून या पुस्तकाची निवड करण्यासारखी आहे.

या पुस्तकाचें हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रांतिक भाषांतून भाषांतर झाल्यास आंतरप्रांतीय सांस्कृतिक विनिमयाच्या दृष्टीनें त्याचा चांगला उपयोग होईल. इंग्रजींतहि याचें भाषांतर झाल्यास मराठी रंगभूमीचें स्वरूप पाश्चात्यांना कळण्याचे दृष्टीनें त्याचा उपयोग होऊं शकेल.

अशा प्रकारच्या एका अभिनव पुस्तकाची रचना केल्याबद्दल माझ्या-प्रमाणेंच महाराष्ट्रांतील सर्व साहित्यप्रेमी आणि शिक्षणसेवक श्री. साठे यांना धन्यवाद देतील अशी मला खात्री आहे.

आश्रम—सासवड<br>जि. पुणें<br>१२।४।४८

स. ज. भागवत

# भूमिका

मराठी नाटचवाङ्मयाचा अद्ययावत इतिहास स्थूल स्वरूपांत विद्यार्थ्यांच्या पुढें मांडण्याच्या भूमिकेवरून मुख्यत: प्रस्तुत 'नाटचकथा' लिहिल्या आहेत. मूळ नाटकें वाचणें वा पाहाणें हें सामान्य विद्यार्थ्याला निरनिराळ्या कारणांमुळें शक्य नसतें. नाटकांचीं पुस्तकेंच पुष्कळदां मिळूं शकत नाहींत. क्वचित् प्रसंगीं मिळाल्यास तीं वाचण्याइतपत हुरूप फार थोड्यांजवळ असतो. ह्या वयांत नाटक वाचण्यापेक्षां पाहाण्याकडेच अधिक प्रवृत्ति असणें हें अगदीं साहजिकच आहे. परंतु हीहि हौस पुरी होण्याची शक्यता फार थोडी असते. कारण जुन्या नाटकांचे प्रयोग अगदीं क्वचितच होतात, आणि झालेच तर शहरांतील विद्यार्थ्यांखेरीज—( आणि तेहि आर्थिक दृष्ट्या परवडूं शकणाऱ्या अत्यंत अल्पसंख्य विद्यार्थ्यांना ! )—इतरांना तें पाहाणें बहुधा शक्य नसतें. नाटचवाङ्मय व नाटचप्रयोग यांबाबत विद्यार्थ्यांच्या बाबतींत अशी सर्व बाजूंनीं प्रतिकूल परिस्थिति असतांहि त्यांच्या मनांत ह्या कलाप्रकाराबाबत किती उत्कंठा व आपुलकी वसत असते हें शिक्षणसंस्थांतील संमेलनें वा अन्य समारंभ यांच्या निमित्तानें मुलांकडून केल्या जाणाऱ्या नाटच वा नाटचप्रवेश-प्रसंगीं उत्तम प्रकारें दिसून येतें. नाटचपूर्ण प्रसंग, संवाद, अभिनय यांच्या प्रयोगांत मानासिक क्रियेपेक्षां शारीरिक क्रियेला, स्वतंत्र कृतीपेक्षां अनुकरणाला, श्राव्यापेक्षां दृश्याला, वैयक्तिक गुणांच्या प्रदर्शनाला गृह वा वर्ग यापुरतीच मर्यादा न राहातां मनसोक्त विस्तृत क्षेत्र मिळण्याला, वैयक्तिक रीत्या कार्य करण्यापेक्षां गटानें वा संघटनेनें काम करण्याला अधिक वाव मिळत असल्यामुळें विकसित—उत्क्रांत अवस्थेतील बालमनाला इतर कुठल्याहि कलाप्रकारापेक्षां नाटचाबद्दल एक प्रकारचा अपूर्व जिव्हाळा व गोडी वाटून तें त्याच्याशीं चटकन् तद्रूप होऊं शकतें. नाटचकलेबाबत बालमनांत वसत असलेल्या या सहजस्फूर्त आपुलकीच्या व आदराच्या वृत्तीला केवळ भाबड्या भक्तिचें स्वरूप राहूं नये, तिच्या ठायीं वसत असलेली अभिजात रसिकता अधिक सज्ञान व डोळस व्हावी, या कलाप्रकाराची पूर्वपीठिका करून त्यांतील प्रमुख नाटककारांची तोंडओळख व्हावी व त्यांच्या प्रातिनिधिक स्वरूपाच्या कृतींचें नाटयात्मक कथांच्या रूपानें ज्ञान व्हावें आणि एकंदर मराठी

नाट्यसृष्टीचा अद्यावत् इतिहास ढोबळ स्वरूपांत त्यांच्यापुढें मांडला जावा या बुद्धीनें मुख्यतः हें पुस्तक रचिलें आहे.

ह्या पुस्तकांतील नाट्यकथा लिहित असतांना कांहीं गोष्टी कटाक्षानें पाळलेल्या आहेत. (१) मूळ नाटकांतील महत्त्वाच्या घटना, प्रसंग व व्यक्ति या जितक्या नाट्यात्मक स्वरूपांत मांडतां येतील तेवढ्या मांडण्याचा प्रयत्न केला आहे. (२) प्रमेयप्रधान नाटकांतील प्रमेय जितक्या उत्कटतेनें मांडितां येईल तेवढें मांडण्याचा यत्न केला आहे. (३) नाट्यकथांचे प्रारंभ संग्रामजन्य वाक्यानें वा संवादानेंच करणें, ही पद्धति सर्व कथांबाबत अगदीं कटाक्षानें योजिलेली आहे. (४) मूळ नाट्याची कल्पना येण्याच्या दृष्टीनें त्यांतील संवाद बहुधा मुळाबरहुकूम व क्वचित् आवश्यक ते फेरफार करून जेवढे देतां येतील तेवढे देण्याचा प्रयत्न केला आहे. मा. ना. जोशी, प्र. के. अत्रे, मो. ग. रांगणेकर वगैरेंच्या नाटकांत कथानक असें अत्यल्प आहे. स्वतः त्या नाटककारांनींहि ही वस्तुस्थिति आपल्या प्रस्तावनांतून मान्य केलेली आहे.* यामुळें अर्थातच या नाटककारांच्या नाटकाधारें लिहिलेल्या नाट्यकथांत कथेपेक्षां संवादालाच प्राधान्य आलेलें आहे. परंतु या प्रतिकूल परिस्थितीमुळें प्रस्तुत पुस्तकाचा मूळ उद्देश—नाट्यसृष्टीचा उत्कट रीतीनें परिचय करून देण्याचा—विफल न होतां उलट इतर कथांपेक्षांहि अधिक प्रमाणांत सफल होण्यास एक तऱ्हेनें मदतच झाली आहे. (५) मूळच्या कांहीं नाटकांत अधून

---

* (१) **श्री. मा. ना. जोशी** यांनीं त्यांच्या नेहमींच्या उपहासाच्या पद्धतीनें 'स्थानिक–स्वराज्य' या नाटकांत एक असें कथानक नाहीं ही गोष्ट सूत्रधार व नटी यांच्या संवादाद्वारें पुढीलप्रमाणें ऐकविलेली आहे.

नटी : कथानक तरी काय आहे तुमच्या नाटकाचें?

सूत्रधार : कथानक होय? शेंकडों कथानकें आहेत त्यांत...मुख्य प्लॉट म्युनिसिपालिटीचा स्वतःचा आहे. त्याला अनुलक्षून सर्व प्रवेश आहेत! (पृ. २)

(२) **श्री. प्र. के. अत्रे** 'साष्टांग नमस्कारा' च्या 'मंगलचरणां'त लिहितात, "प्रेक्षकांचें केवळ विनोदपूर्वक मनोरंजन करणें एवढाच हेतु मीं माझ्या डोळ्यापुढें ठेविला आहे. या नाटकाचें कथानकहि अत्यल्प आहे. संवाद व स्वभावलेखन या दोनच कसोट्यांवर हें नाटक घासून पहातां येण्यासारखें आहे." (पृ. १)

मधून येणारे उत्तान-शृंगारपर प्रसंग व भाषणें आणि बीभत्स वा ग्राम्य स्वरुपाचा विनोद—हे दोन्ही प्रस्तुत नाट्यकथांत कटाक्षानें टाळलेले आहेत.

नाट्यकथारंभीं लिहिलेल्या प्रस्तावनावजा माहितीसंबंधींहि थोडा खुलासा करणें अवश्य आहे. कोणत्या विशिष्ट परिस्थितींत नाटककारानें आपलें नाटक लिहिलें हें सांगण्याच्या निमित्तानें मराठी नाट्येतिहासाचा परिचय ढोबळ स्वरूपांत करून देण्याचा प्रयत्न या प्रस्तावनांतून केलेला आढळेल. नाट्यसृष्टीमागील धार्मिक, सामाजिक, आर्थिक व राजकीय पार्श्वभूमि अधून मधून बुद्धिपुरःसरच दिलेली आहे. या माहितीमुळें नाटककाराच्या नाट्यवाङ्मयाचें वैशिष्ट्य अधिक चांगल्या प्रकारें लक्षांत येईल अशी खात्री आहे. ही पार्श्वभूमि देत असतांना तत्कालीन व आधींच्या प्रमुख नाटकांचा जेवढा परिचय करून देणें शक्य होतें तेवढा करून दिलेला आहे. या प्रस्तावनांतून नाटककारांचे दोष सांगणें शक्य तों बुद्धिपुरःसरच टाळलेलें आहे. विश्वविद्यालयीन वा उच्च अभ्यासक्रमांत नाटकांचा तौलनिक विचार करितांनाच दोषदर्शनाची गरज असते. प्राथमिक अवस्थेंतच त्यांचा उल्लेख करणें आवश्यक नाहीं व हितावहहि नाहीं. तसेंच नाट्यवाङ्मयाच्या इतिहासांतले निरनिराळे प्रवाह सांगत असतांना केलीं गेलेलीं कांहीं विधानें, त्यांच्या संक्षिप्त वा सूत्रवजा स्वरूपामुळें, अगदीं क्वचित् स्थळीं कां होईना, पण 'मुलांच्या डोक्यावरून जाणारीं' अशीं झालीं आहेत याची जाणीव आहे. परंतु प्रस्तावनांचा अवघा दोन-तीन पानांचा वाव लक्षांत घेतां हा अल्प दोष अटळ आहे, हें जाणत्यांच्या लक्षांत येईल. चौकस विद्यार्थ्यांनी यावाबत कांहीं पृच्छा केल्यास पालक व शिक्षक त्याबाबत आवश्यक ती अधिक माहिती देऊन या नाममात्र दोषांचें परिमार्जन करतील अशी अपेक्षा आहे. प्रस्तावनांप्रमाणेंच 'परिशिष्टां' द्वारें दिलेली माहितीहि जितकी उद्बोधक तितकीच मनोरंजकहि होईल अशी आशा आहे.

प्रस्तुत पुस्तकाच्या कल्पनेबद्दल आणखी एक खुलासा नम्रपणें करूं इच्छितों. प्रसिद्ध इंग्रज लेखक चार्लस् लँब यानें शेक्सपिअरच्या नाटकाधारें लिहिलेल्या नाट्यकथांवरून (Lamb's Tales) प्रस्तुत नाट्यकथा स्फुरलेल्या नाहींत. येथें लँबप्रमाणें एकाच नाटककारावर लक्ष केंद्रित केलेलें नाहीं किंवा त्याच्या विशिष्ट शैलीनेंहि यांतील कथा लिहिल्या गेल्या नाहींत. कथारंभीं दिलेल्या प्रस्तावना व पुस्तकाच्या शेवटीं असलेलीं परिशिष्टें यांच्याबाबत तर साम्याचा प्रश्नच उद्भवत नाहीं. तौलनिक दृष्ट्या विचार करणाऱ्या टीका-

कारांची व्यर्थ फसगत होऊं नये या प्रामाणिक बुद्धीनेंच केवळ हा खुलासा करीत आहें, आत्मप्रौढीनें नव्हे !

भोंवतीं अधिक महत्त्वाच्या कामांची अक्षरशः चवड लागलेली असतां नाहि वेळांत वेळ काढून आचार्य स. ज. भागवत यांनीं ह्या नाटचकथा अत्यंत आस्थेनें व बारकाईनें वाचून त्यांबाबत कित्येक बहुमूल्य अशा सूचना मला वेळोवेळीं केल्या. ह्या त्यांच्या साहाय्याबद्दल व त्यांनीं लिहून दिलेल्या मार्मिक प्रस्तावनेबद्दल मी त्यांचा अत्यंत ऋणी आहे. त्याचप्रमाणें प्रस्तुत नाटयकथा हस्तलिखित स्वरूपांत असतांना त्या बारकाईनें वाचून त्यांत कित्येक महत्त्वाच्या सुधारणा सुचविल्याबद्दल प्रा. रा. श्री. जोग, श्री. के. बा. भोळे, प्रा. अ. के. भागवत, प्रा. ग. प्र. प्रधान, सौ. मालती साठे व सौ. सरल चिवटे यांचा मी अत्यंत आभारी आहें. पुणें येथील सुप्रसिद्ध 'दि सोशल क्लब' या नाटयसंस्थेचे अध्यक्ष श्री. भाऊसाहेब दातार यांनीं, त्यांनीं स्वतः तयार केलेल्या 'आर्ट गॅलरी'चा, या पुस्तकांतील नाटककारांचे ब्लॉक्स तयार करण्याकरितां अत्यंत मोकळेपणानें उपयोग करून दिला याबद्दल मी त्यांचा अत्यंत ऋणी आहें. दर्शनी चित्र काढून दिल्याबद्दल चित्रकार श्री. दीक्षित, श्री. देशपांडे यांचा व आंतील ब्लॉक्स् तयार करून दिल्याबद्दल श्री. मोघे व बागाईतकर यांचा मी आभारी आहें. या नाटयकथांच्या प्रकाशनाबाबतचे 'व्यावहारिक स्वरूपाचे प्रश्न' सोडविण्याकरितां श्री. बाळासाहेब सोमण, सौ. अनसूया लिमये, प्रा. भाऊसाहेब पटवर्धन, श्री. विश्वनाथपंत चिवटे, श्री. न. रा. देशपांडे व या पुस्तकाचे प्रकाशक श्री. अमरेन्द्र गाडगीळ ही निकटची स्नेही मंडळी माझ्या पाठीशीं उभी नसती तर ह्या 'मराठी नाटचकथा' माझ्याजवळ हस्तलिखित स्वरूपांतच पडून राहिल्या असत्या !

विद्यार्थी, शिक्षक, पालक व इतर प्रौढ स्त्रीपुरुष वाचक या 'मराठी नाटचकथा' आस्थेनें वाचून त्यांत त्यांना आढळणाऱ्या दोषांचें व उणीवांचें दर्शन मला मोकळेपणानें घडवितील तर त्यांच्या त्या आपुलकीबद्दल मी निरंतर कृतज्ञ राहीन.

३१७ सदाशिव,
शिवाजी मंदिर पिछाडी,
पुणें शहर.

—वि. द. साठे

# अनुक्रमणिका

प्रकरण....१ लें

★ ★

# मराठी नाट्यसृष्टीचा उगम व विकास

## प्रातिनिधिक स्वरूपाचा लोकप्रिय कलाप्रकार

मराठी भाषा बोलणाऱ्या सुमारें दोन कोटी लोकांचा प्रातिनिधिक स्वरूपाचा, आपल्या उत्पत्तिकालापासून आजच्या घटकेपर्यंत अखंड परंपरा असलेला, जनतेच्या सामाजिक, धार्मिक, राजकीय व आर्थिक प्रश्नांचे पडसाद उमटविणारा, करमणूक करितांना वर्णभेद न मानणारा व साक्षरांइतकाच निरक्षरांतहि लोकप्रिय असलेला असा कोणता कलाप्रकार असेल तर तो 'नाटक' हा होय. चित्रपटाच्या चालू जमान्यांतहि त्याच्या लोकप्रियतेंत फारसा व्यत्यय आलेला नाहीं. प्रेक्षकांची बदलती अभिरुचि लक्षांत घेऊन त्यानुसार नाटकें लिहिणाऱ्या श्री. प्र. के. अत्रे व श्री. मो. ग. रांगणेकर या दोन नाटककारांनीं सध्यांच्या चित्रपटाच्या जमान्यांतच केवळ स्वतःच्या नाटकांच्या जोरावर अनुक्रमें 'बालमोहन' व 'नाट्यनिकेतन' ह्या दोन नाटककंपन्या—थोडाथोडका काळ नाहीं, तर जवळ जवळ एकेक तप—चालवून दाखविलेल्या आहेत. साठी उलटलेले श्री. नारायणराव राजहंस (बालगंधर्व) अजूनहि अधून मधून आपल्या जुन्या लोकप्रिय भूमिका करून अक्षरशः हजारांनीं उत्पन्नाचे आंकडे मोजूं शकत आहेत. तात्पर्य मराठी रंगभूमीची लोकप्रियता अद्ययावत् अखंड आहे. चित्रपटाच्या वाढत्या प्रसारामुळें तिच्या रसिक आश्रयदात्यांच्या आस्थेंत फारसा व्यत्यय आलेला नाहीं.

## मराठी नाट्याची उत्पत्ति

आपल्या केवळ वैशिष्ट्यानें आजतागायत टिकून असलेल्या या मराठी नाट्याची परंपरा फार जुनी आहे.

मराठींतील सर्वांत जुनें उपलब्ध नाटक 'लक्ष्मीनारायणकल्याण' हें होय. तें प्रथम सुप्रसिद्ध इतिहास संशोधक श्री. वि. का. राजवाडे यांना तंजावर येथील एका रामदासी मठांत सांपडलें. त्यांच्या मतें तें इ. स. १६८२ च्या सुमारास एकोजीसुत शाहूराजे यांनीं रचिलेलें आहे. या शाहू राजाचीं 'पंचभाषाविलास', 'गोवर्धनोद्धारण', 'गंगाकावेरीसंवाद' वगैरे आणखी आठ नाटकें अलिकडे उपलब्ध झालेलीं आहेत. परंतु आज उपलब्ध असलेलें मराठींतलें पहिलें नाटक १६८२ च्या सुमाराचें असलें तरी तत्पूर्वीच्या कालखंडांतल्या ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास, वगैरेंच्या काव्यांतून येणाऱ्या नाटकांच्या उल्लेखावरून मराठी नाट्याचा उगमकाल आणखी चारशें वर्षें मागें जातो. मात्र या कालखंडांत—म्हणजे मराठी नाट्यसृष्टीच्या या प्रारंभीच्या कालांत जीं नाटकें होत असत त्यांना आजच्यासारखें परिणत स्वरूप अर्थातच प्राप्त झालेलें नव्हतें. तीं अगदीं प्राथमिक अवस्थेंतच त्या वेळीं होतीं. कळसूत्री बाहुल्यांचे नाच; गोविंदाचीं व बहुरूप्यांचीं सोंगें, गोपाळकाला व दशावतार यांत आणिलीं जाणारीं सोंगें, ललित, गोंधळ, तमाशा, प्रहसन—हे या कालखंडांतील मुख्य नाट्यप्रकार होत. आजच्या कालांतील नाटकांशीं तुलना करितां हे सर्व नाट्यप्रकार जरी अत्यंत सामान्य स्वरूपाचे वाटत असले तरी त्यांनींच मराठी नाट्यसृष्टीचें बीज पेरलेलें आहे हें आपणांस विसरून चालणार नाहीं. मिरॅकल प्ले (ललित), मोरॅलिटी (सन्मार्गदर्शक नाटक), इंटरल्यूड (नाटकांतच अंतर्भाव असलेलें छोटें नाटक), फार्स (प्रहसन) या छोट्या छोट्या नाट्यप्रकारांनीं ज्याप्रमाणें आजच्या इंग्रजी नाट्यसृष्टीचा एके काळीं पाया घातला त्याचप्रमाणें कळसूत्री बाहुल्या, गोविंदाचीं व बहुरूप्यांचीं सोंगें, गोपाळकाला, दशावतार, भारूड, ललित, तमाशा, प्रहसन या नाट्यप्रकारांनीं आजच्या मराठी नाट्यसृष्टीचा पाया घातलेला आहे.

**प्रारंभीचे पायाभूत नाट्यप्रकार**

**कळसूत्री बाहुल्यांच्या** खेळाला जुन्या मराठींत 'दारुयंत्र', 'साइखडें' (छाया-कीडा-कीडन) असे शब्द आहेत. या खेळांत सूत्रधार (आजच्या कालांतील दिग्दर्शक ऊर्फ डायरेक्टर) हा पडद्याच्या आड उभा राहतो व प्रेक्षकांच्या समोर मांडून ठेविलेल्या लांकडी वा कपड्यांच्या बाहुल्यांना बांधलेल्या सूत्रांच्या साहाय्यानें त्यांच्या मनोविचक व कथानकाशीं सुसूत्र अशा हालचाली मोठ्या कौशल्यानें करून घेतो. खेळाच्या प्रारंभीं गणपति व सरस्वती या देवता दाखविल्या जातात व नंतर सूत्रधार निरनिराळ्या बाहुल्यांच्या द्वारें एखादें पौराणिक कथानक करून दाखवितो. आवश्यक तेथें कथाभागांतील घटना स्वतः तोंडानें सांगून तो बाकीच्या सर्व घटना बाहुल्यांच्या हालचालींच्या द्वारां व्यक्त करण्याचा प्रयत्न करितो. अजूनहि अधून मधून असे बाहुल्यांचे खेळ करविणारे लोक खेडेगांवांतून व क्वचित् शहरांतूनहि आपल्या छोट्याशा सरंजामानिशीं वावरतांना आढळून येतात. सावंतवाडीकडील कोंकणविभागांत कळसूत्री बाहुल्यांचे खेळ करणाऱ्या लोकांची एक जातच आहे. या जातीच्या पुरुषाला 'ठाकर' व स्त्रीला 'ठाकरीण' असें म्हणतात. जावा, सुमात्रा, बाली, वगैरे बेटांमध्यें संशोधकांना प्राचीन हिंदु संस्कृतीचे जे अवशेष आढळून आलेले आहेत त्यांत 'कळसूत्री बाहुल्यांचा खेळ'हि आढळलेला आहे.

**बहुरूपी** हे भिक्षा मागून उपजीविका करितात. भिक्षा मागण्याचें एक साधन म्हणून ते रोज नवीं नवीं सोंगें आणून भाषण व अभिनय-द्वार त्याची बेमालूम बतावणी करितात. गोविंदाचीं सोंगें म्हणजे निरनिराळ्या देवादिकांचीं सोंगें घेणें होय. हीं बहुधा लहान मुलांकडुनच घेतलेलीं असत. पेशवाईत हीं प्रचलित होतीं. कृष्णजन्माष्टमीच्या निमित्तानें जो **गोपाळकाला** करण्यांत येतो त्यांत गोपाळकृष्ण, यशोदा व इतर गोपमंडळी यांचीं सोंगें आणण्याची चाल फार प्राचीन काळापासून आजनागायत रूढ आहे. **दशावतारी सोंगें** हीं कोंकणांत विशेष रूढ आहेत.

धार्मिक उत्सवप्रसंगीं मत्स्य, कच्छ, वराह, नारसिंह वगैरे दशावतारांची सोंगें आणिलीं जात. दशावतारांच्या प्रयोगांना अर्थातच सध्यांसारख्या सामानांची गरज लागत नसे. एक सरकपडदा, दोनचार हिलाल, चारपांच धोतरें व लुगडीं, एकदोन कागदी अथवा पानांचे किरिट, थोडी राळ व शेंदूर एवढ्या अल्प साहित्यानिशीं भगवंताचे दाही अवतार दाखविले जात!

**गोंधळांत** देवी भक्तांची स्तुति व त्याच्या अनुषंगानें थोडें नृत्य करण्याची प्रथम वहिवाट असे. परंतु पुढें पोवाडे व नकला यांचाहि त्यांत समावेश करण्यांत येऊं लागला. 'गोंधळ' करणारे ते 'गोंधळी'. ते स्वतःला देवी भवानीचे पुत्र समजतात व आपल्या पेशाचें वैशिष्ट्य म्हणून गळ्यांत कवड्यांची माळ घालितात. अजूनहि कित्येक ठिकाणीं उत्सवाच्या निमित्तानें, लग्नप्रसंगाच्या निमित्तानें गोंधळी मंडळींना बोलावून त्यांच्याकडून रात्रीच्या प्रसंगीं सर्व निमंत्रितांसमोर ' गोंधळ ' करवून घेण्याची पद्धति रूढ आहे.

**ललित** हें देवादिकांच्या उत्सवप्रसंगीं—विशेषतः नवरात्राच्या अखेरच्या दिवशीं करण्याची पद्धत अजूनहि कांहीं भागांत रूढ आहे. यांत आरंभीं देवादिकांचीं सोंगें आणून दशावतारांतील कांहीं अद्भुत प्रसंग करून दाखवितात व शेवटीं रामाकडून रावणाचा वध करून ललित संपवितात. कांहीं ठिकाणीं हीं ललितें कीर्तनाचाच एक भाग म्हणून करण्याचीहि पद्धति रूढ आहे. कीर्तनांतील पूर्वरंग संपल्यानंतर वासुदेव दिंडीगाण, छडीदार, भालदार वगैरेंचीं सोंगें पुढें येतात. त्यांच्यांत साभिनय संभाषणें चालतात. शेवटीं देवाची आरती करून ते त्याच्याजवळून प्रसाद मागून घेतात व तो कीर्तनास जमलेल्या साऱ्या मंडळींना वांटतात. हें सर्व प्रकरण आवरल्यावर कीर्तनकार पुन्हां येवढा वेळ थांबवून धरिलेलें आपलें कीर्तन पुढें चालू करितो. या विशिष्ट पद्धतीमुळें ललितांत कोणत्याहि प्रकारची कथासंगति हीं फारच अल्प प्रमाणांत आढळून येते. इंग्रजींतील मिरॅकल प्लेज् ( *Miracle Plays* ), कन्नड यक्षगान,





आंध्र भागवतमेल नाटक, गुजराथी भवाई आणि बंगाली यात्रा हे नाट्य-प्रकार कांहींसे मराठी ललितासारखेच आहेत.

**तमाशा** हें ' तमाशा ' या अरबी शब्दाचें मराठी रूप आहे. 'मनाला आनंद देणारें दृश्य ' असा त्याचा अर्थ आहे. मुसलमानी अमदानींत बादशाही वैभवाबरोबरच जे कांहीं करमणुकीचे प्रकार महाराष्ट्रांत रूढ झाले. त्यांत तमाशा प्रामुख्यानें मोडतो. हा नाट्यप्रकार पेशव्यांच्या कारकीर्दींत—विशेषतः सवाई माधवराव व दुसरे बाजीराव यांचे कालखंडांत विशेष नांवारूपाला आलेला दिसतो. तमाशांत साधारणपणें सात इसम अवश्य असतात. तुणतुणेवाला, मंजिरीवाला, ढोलकीवाला, कडेवाला, नायक, नायिका व सोंगाड्या. तमाशांत गद्य भाग फार थोडा व पद्य भाग बऱ्याच प्रमाणांत असतो. हा पद्य भाग निरनिराळ्या लावण्यांत रचिलेला असतो. तमाशांतून म्हटल्या जाणाऱ्या लावण्या बहुधा कडेढोलकीच्या लावण्या म्हणून ओळखिल्या जातात. संविधानकांत कांहीं कथासूत्राच्या योगानें जेव्हां लावण्या गुंफिल्या जातात तेव्हां त्या संविधानकास 'वग' असा तांत्रिक शब्द रूढ आहे. दोन लावण्यांचा संदर्भ दाखविणारें जें भाषण करितात त्याला 'संपादणी करणें' असें म्हणतात; व ही संपादणी जो करितो त्याला ' सोंगाड्या ' असें म्हणतात. महाराष्ट्रांतील बहुजन समाजाचें व शैलीच्या दृष्टीनें मराठमोळ्याचें अशा गौरवपूर्ण शब्दांनीं ज्याचा उल्लेख केला जातो तें शाहिरी वाङ्मय मुख्यतः ह्या तमाशाच्या निमित्तानें निर्माण झालेलें आहे. आतांपर्यंत उल्लेखिलेले मराठी नाट्यसृष्टीचे पायाभूत असे इतर नाट्यप्रकार आतां जवळजवळ नामशेष होत आलेले आहेत. परंतु ' तमाशा ' हा नाट्य-प्रकार आपल्या महाराष्ट्रीय बाण्याला साजेशा ताठ्यानें व अभिमानानें अजून खडा आहे. खेडेगांवांत अद्यापिहि तमाशाची रंगभूमि जागृत आहे. शहरांतून किंचित् आडबाजूला कां होईना—परंतु खास तमाशाचें म्हणून एक एक तरी नाट्यगृह चालू असल्याचें आढळून येतें. तमाशाची ही अद्यावत् व अखंड अशी लोकप्रियता पाहून अलिकडे, सुशिक्षितांचा

प्राय: ज्यांत भरणा असतो, अशा नाट्यसंमेलनांतूनहि एक दिवस तमाशाच्या कार्यक्रमाकरितां ठेवून अल्पसंख्य परंतु उच्च अभिरुचीचे सुशिक्षित रसिक अशिक्षित तमासगिरांच्या मानाच्या मुजऱ्याचा स्वीकार करूं लागले आहेत. तमाशांनीं ऐन मराठेशाहीच्या अमदानींत लढाईंत दमून आलेल्या सैनिकांना जसें रिझविलें आहे तसेंच इंग्रजी अमदानींत झालेल्या दोन्ही महायुद्धांवर गेलेल्या महाराष्ट्रीय सैनिकांनाहि रिझविलें आहे. लोकमान्य टिळकांनीं राजकीय प्रचारार्थ साधन म्हणून तमाशाचा उपयोग केलेला आहे. 'सत्यशोधक समाजा'नें आपल्या मतप्रतिपादनाकरितां तमाशाचा बऱ्याच मोठ्या प्रमाणांत उपयोग केला होता. १९४२ मध्यें महात्मा गांधींनीं आरंभिलेल्या प्रचंड स्वातंत्र्यसंग्रामाचे प्रसंगींहि पुणें, मुंबई, सातारा, औंध, कोल्हापूर, सोलापूर येथील शाहिरांनीं अगदीं अभिनव स्वरूपाचे असे तमाशे लिहून व त्यांचे प्रयोग शाहीर पथकांतर्फे करून खेडोपाडीं सर्वत्र पसरलेल्या बहुजन समाजांत राजकीय जागृति करण्याचें एक उत्तम साधन म्हणून तमाशा ह्या नाट्यप्रकाराचा उपयोग करून दाखविलेला आहे. तमाशाची ही पूर्वपीठिका, अद्ययावत् लोकप्रियता व राजकीय, धार्मिक, सामाजिक विचारांचें तें अलिकडे धरीत असलेलें बाळसें हें सारें दृष्टीपुढें आलें म्हणजे या लोकशाहीच्या कालखंडांत लोकवाङ्मयाच्या प्रांगणांत त्याला किती उज्ज्वल भविष्यकाल लाभणार आहे याची कल्पना येत नाहीं काय ?

मराठी नाट्यसृष्टींतील **प्रहसनाची** कल्पना इंग्रजी नाट्यतंत्रांत ज्याला 'फार्स' (*Farce*) म्हणून संबोधितात त्या नाट्यप्रकारावरून आलेली आहे. याचे प्रयोग स्वतंत्रपणें न करितां मुख्य पौराणिक नाटकाच्या नंतर करण्याची पद्धति फार काळ रूढ होती. यांतील संविधानकांत विस्कळीत व अवास्तव स्वरूपाच्या घटना, विनोदावर भर व तोहि विशेषत: प्रसंगनिष्ठ व अतिशयोक्तिपूर्ण अशा स्वरूपाचा, व्यक्तिदर्शनांत अत्यंत उथळपणा व भाषेंत घरगुती साधेपणा हे विशेष प्राय: आढळतात.

' ढोंगी बैराग्याचा फार्स ', ' ढेरपोट्याचा फजिता ', 'मोर एलएल्. बी.' ' श्वशुर-जामात युद्धप्रसहन ', 'फरद्या मुत्सद्दी' हीं एका काळचीं गाजलेलीं प्रहसनें होत. ललित हीं जशीं कांहीं प्रमाणांत मराठींत पौराणिक नाटकांच्या उत्पत्तीला कारणीभुत झालीं त्याचप्रमाणें हीं प्रहसनें सामाजिक नाटकांच्या उत्पत्तीला कांहीं अंशीं कारणीभूत झालीं.

## विष्णुदास भाव्यांचे ' राम अवतारी खेळे '

प्राथमिक अवस्थेंतील ह्या निरनिराळ्या नाट्यप्रकारांत घोंटाळत असलेल्या मराठी रंगभूमीला कांहीं निश्चित व निर्णायक स्वरूपाचें वळण लावण्याचा कोणी प्रथम प्रयत्न केला असेल तर तो सांगलीच्या श्री. विष्णुदास भावे यांनीं १८४२ सालीं कर्नाटकाच्या उत्तर कानडा प्रांतांतील 'भागवत' नांवाची दशावतारी खेळ करणारी मंडळी सांगलीस आली होती. त्यांचे खेळ पाहून तशा प्रकारचे परंतु अधिक कलापूर्ण व मनोरंजक स्वरूपाचे ' खेळ ' मराठींत रचिले जावे अशी कल्पना त्यावेळचे सांगलीचे अधिपति श्रीमंत चिंतामणराव अप्पासाहेब पटवर्धन यांनीं त्यांचे एक आश्रित श्री. विष्णु अमृत भावे यांजजवळ बोलून दाखविली. भावे यांनीं अल्पावधींतच—म्हणजे १८४३ सालींच—' सीतास्वयंवर ' नांवाचें नाटक रचून त्याचा प्रयोग श्रीमंतांपुढें करून दाखविला.. श्रीमंतांना तो प्रयोग अतिशय आवडल्याचें जेव्हां भावे यांनीं पाहिलें तेव्हां त्याच्या पुढच्याच वर्षीत रामायणांतीलच निरनिराळ्या कथानकांवर त्यांनीं आणखी दहा नाटकें करून दाखविलीं. नंतर भावे यांनीं मुंबई, पुणें, नगर वगैरे प्रमुख शहरीं आपल्या नाटकांचे प्रयोग करून १८६१ पर्यंत उमाप कीर्ति व पैसा मिळविला. श्री. भावे यांना मिळालेलें अपूर्व यश पाहून त्यांच्याच धर्तीवर पौराणिक नाटकें करणाऱ्या कोल्हापूरकर, इचलकरंजीकर, चित्तचक्षुचमत्कारिक, पुणेंकर, अमरचंद वाडीकर वगैरे अनेक कंपन्या अस्तित्वांत आल्या. या स्वरूपाच्या कंपन्या जवळ जवळ १८८५ पर्यंत म्हणजे अण्णा किर्लोस्करांचीं नाटकें लोकप्रिय होईपर्यंत अस्तित्वांत



श्री. विष्णु अमृत भावे

जन्म : १८१९ मृत्यु : १९०१

होत्या. भावे यांच्या पठडीचे सारे विशेष ह्या कंपन्यांच्या नाटकांतून आढळून येतात. श्री. भावे यांच्या नाटकांतील गद्य भाग लिहिलेला नसे; कवितारूप आल्यानें तेवढीं लिहिलेलीं असत. हा काव्यभाग म्हणावयाची जबाबदारी एकट्या सूत्रधारावर असे. इतर पात्रांना फक्त बाकीचा कथा-भाग आधीं समजावून दिलेला असे. या कथाभागाच्या संदर्भानें बाकीच्या

पात्रांना आपआपलीं भाषणें करावयाचीं असत. श्री. भावे यांनीं अगदीं प्रथम जीं नाटकें रचलीं ती रामायणांतील कथाभागावरच असल्यानें त्यांच्या नाटकांस त्या काळीं 'राम अवतारी खेळे' असें म्हणत. 'नाटक' हा शब्द त्या वेळीं रूढ नव्हता. हे 'राम अवतारी खेळे' पुढीलप्रमाणें असत.

"प्रथमतः सूत्रधारानें पडद्याबाहेर एका बाजूस राहून **मंगलाचरण** करावयाचें. त्यांत ईशस्तुतीपर कांहीं पद्यें तालासुरावर म्हणावयाचीं. नंतर वनचराचा वेष घेऊन विदूषकाची स्वारी बाहेर यावयाची. त्याचें वेडें-वांकडें नाचणें झाल्यावर सूत्रधाराचा व त्याचा **विनोदपर संवाद** व्हावयाचा. त्यांत उभयतांची मुलाखत व ओळखदेख होऊन नाटक कोणतें करावयाचें हें सूत्रधारानें सांगावयाचें व पात्रांची सिद्धता व व्यवस्था ठेवण्याविषयीं त्यांस बजावावयाचें. नंतर **गजानन महाराजांचें स्तवन** करून पडदा उघडावयाचा. पडदा उघडल्यावर सूत्रधारानें गजानन महाराजांस वंदन करून नाटकामध्यें विघ्न येऊं नयेत अशा-विषयीं त्यांची प्रार्थना करावयाची; व गजानन महाराजांनीं 'आरंभिलेलें कार्य निर्विघ्नपणें सिद्धीस जाईल' असा आशीर्वाद दिल्यावर पडदा पडावयाचा. नंतर **ब्रह्मकुमारी सरस्वती** इचें स्तवन करून तिला रंगभूमीचे ठायीं पाचारण करावयाचें. तिचें आगमन झाल्यावर पात्रांचे ठायीं धीटपणा व वक्तृत्वशक्ती असावी असा वर मागून घेऊन तिचें विस-र्जन करावयाचें व नंतर **प्रारंभ** करावयाचा. प्रारंभ करतेवेळीं सूत्रधारानें नाटकांत कोणता भाग होणार आहे व आरंभींचा प्रारंभ कसा आहे, याचें पद्यांतून वर्णन करावयाचें. आख्यानें सर्व पौराणिक असल्यामुळें बहुतेक नाटकांतून देवांची एक कचेरी ( प्रवेश ), राक्षसांची एक कचेरी व प्रत्येक पक्षाकडील स्त्रियांची एक कचेरी अशा **कचेऱ्या** होत. त्यांतून उलट पक्षाचा पाडाव करून आपण जय कसा मिळवावयाचा याचीच बहुधा वाटाघाट होई. ही वाटाघाट चालतांना एका पात्रानें दुसऱ्या पात्रास मधून मधून 'सांगतों ऐक' म्हणावें व सूत्रधारानें पद्य

म्हणून त्यांतून त्याचा मनोभाव व्यक्त करावा. देववेष व राक्षसवेष यांचीं भाषणें पूर्वींच सगळीं तयार केलेलीं असत असें नाहीं; कांहीं कांहीं पूर्वीं तयार करीत व कांहीं कथाभाग लक्षांत ठेवून समयस्फूर्तीवर वेळ मारून नेत......नाटकाचा प्रयोग चालू असतांना पात्रांना विश्रांती देणें, त्यांना पडद्याआडून भाषणें सुचविणें वगैरे कामें सूत्रधाराकडे असल्यामुळें त्याला आरंभापासून अखेरपर्यंत साथीदारांसह गायनवादनाचें साहित्य घेऊन सज्ज रहावें लागे. विदूषकासहि पहिल्यापासून शेवटपर्यंत काम असे. त्या वेळीं आतांप्रमाणें पडद्याच्या आंत देखाव्याची किंवा स्थळविशेषाची मांडणी करीत नसून पडदेहि पुष्कळ नसत. पुढच्या एका पडद्यावर काम चाले, व तो कड्या लावून दोरीनें ओढून घेतां येण्यासारखा केलेला असे. हा पडदा एकदां सारला कीं, नाटक संपेपर्यंत बहुधा पुढें ओढीत नसत. रंगभूमीवर कचेरीचा थाट म्हणजे चार दोन खुर्च्या ओळीनें घातल्या म्हणजे झाला. देवांची कचेरी याच खुर्च्यांवर; ती आटपली कीं, राक्षसांची कचेरी याच खुर्च्यांवर व राक्षसांची आटपली कीं, स्त्रियांची कचेरी याच खुर्च्यांवर ! याप्रमाणें सगळ्या कचेऱ्या वगैरे एकाच बैठकीवर बहुत करून होत. या सर्व प्रसंगीं विदूषकास तेथें मांडणी करण्याकरितां किंवा कांहीं लागलें सवरलें तर तें देण्याकरितां उभें रहावें लागत असे; व देवांस, राक्षसांस, किंवा स्त्रियांस हरएक प्रसंगीं विदूषक म्हणजे एक तोंडीलावणेंच होई. अर्थात कोणास कांहीं आठवेनासें झालें कीं त्यानें विदूषकास कांहीं तरी प्रश्न करावा; एखाद्या पात्रास आंतून यावयास उशीर झाला कीं, बाहेर असलेल्या पात्रानें विदूषकाशीं थट्टा आरंभावी; व स्त्रियांच्या कानांतला अगर नाकांतला एखादा दागिना पडला कीं तो विदूषकानें उचलून द्यावा याप्रमाणें रंगभूमीवर पडेल तें काम विदूषकास करावें लागे. " ( आ. वि. कुलकर्णीकृत 'मराठी रंगभूमि'—पृ. १३ ते १५ )

**बुकिश नाटकें :** भाव्यांच्यानंतर ज्या अनेक नाटक कंपन्या स्थापन

झाल्यां त्यांनीं या पौराणिक नाटकांत प्रेक्षकांच्या अभिरुचीनुसार आवश्यक ते बदल तर केलेच नाहींत पण उलट पहिल्या नाटकांतील सोज्ज्वळ स्वरूप घालवून त्यांत राक्षसपात्रांच्या आरडाओरडीला व विदूषकांच्या अचरटपणाला मात्र भरपूर वाव दिला. यामुळें लवकरच लोकांना त्यांचा कंटाळा येऊं लागला. नाटयसंस्थांना येऊं पहात असलेल्या या अनुचित वळणाला सुधरावयाचें कार्य तत्कालीन सुशिक्षितांनीं हातांत घेतलें. १८४७ सालापासून मुंबई, कलकत्ता व मद्रास येथें इंग्रजी विद्यापीठें स्थापन झाल्यापासून इंग्रजी व संस्कृत भाषांतील वाङ्मयाचा अभ्यास नव्या दृष्टिकोनांतून व विशेष आस्थेनें असा सुरू झाला. या विद्यालयांतून बाहेर पडणाऱ्या व नवी दृष्टि आलेल्या इतर तत्कालीन विद्वानांनीं पतित होऊं पहाणाऱ्या मराठी रंगभूमीला सुधारण्याच्या बुद्धीनें तिच्यापुढें संस्कृत व इंग्रजी भाषांतील उत्तमोत्तम नाटकांचे आदर्श भाषांतर वा रूपांतर-रूपानें ठेविले. परशुरामपंत तात्या गोडबोले, गणेशशास्त्री लेले, कृष्णशास्त्री राजवाडे वगैरे मंडळींनीं 'वेणीसंहार' (१८५९), 'शाकुंतल' (१८६१), 'मुद्राराक्षस' (१८६७), 'मृच्छकटिक' (१८८१) यांसारख्या सुप्रसिद्ध संस्कृत नाटकांची व महादेवशास्त्री कोल्हटकर, शंकर नारो रानडे, विष्णु मोरेश्वर महाजनी वगैरे मंडळींनीं शेक्सपिअरच्या नाटकांचीं रूपांतरें करून तीं छापून ग्रंथरूपानें जनतेपुढें ठेविलीं. यापूर्वीं नाटकांचीं पुस्तकें छापण्याची पद्धत नव्हती; त्यामुळें जुन्या जमान्यांतले लोक या नव्या नाटकांचा '**बुकिश नाटकें**' अशा वैशिष्टयदर्शक शब्दप्रयोगानें उल्लेख करीत. या बुकिश नाटकांपासून रंगभूमीवरील देखावे, पडदे, पोशाख वगैरे प्रायोगिक तपशिलांतहि बराच बदल झाला. पूर्वींच्या पौराणिक नाटकांतील पडद्यांवर केवळ शंकर, मारुती, गणपति वगैरे देवांचीं ओबडधोबड चित्रें काढलेलीं असत. परंतु बुकिश नाटकांतील पडद्यांवर रस्ता, देऊळ, बाग, महाल, डोंगर, जंगल, नदी वगैरेंचीं दृश्यें रंगविलेलीं दिसूं लागलीं. पूर्वीं बागेचा देखावा दाखवावयाचा असेल तर पडद्यावर पांच चार झाडें व कुंड्या काढून दाखवीत. परंतु आतां रंगभूमीवर प्रत्यक्षपणें कुंड्या, कापलेल्या झाडांचीं चित्रें लावून खऱ्या बागेचा आभास उत्पन्न करूं लागले.

## प्रकरण....२ रें





जन्म
१८४३

मृत्यु
१८८५

श्री. ब. पां. किर्लोस्कर

पहिल्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें मराठी रंगभूमीला असें चोहोंबाजूंनीं उत्साहवर्धक वातावरण व प्रगतिकारक दिवस असतांनाच श्री. बळवंत पांडुरंग ऊर्फ अण्णासाहेब किर्लोस्कर यांनीं ‘ अल्लाउद्दीनची चितुरगडावर स्वारी ’ ( १८६७ ते ७० चे दरम्यान ), ‘ शांकरदिग्विजय ’ ( १८७३ ), ‘ संगीत शाकुंतल ’

(१८८१), 'संगीत सौभद्र' (१८८२), 'संगीत रामराज्यवियोग' (१८८४) हीं नाटकें लिहिलीं.

महाभारतांतील अर्जुन-सुभद्राविवाहाच्या प्रसंगावर श्री. अण्णा किर्लोस्करांनीं आपल्या 'सौभद्र' नाटकाचें कथानक उभारलेलें आहे. 'स्वकपोलकल्पित रचना' हें या नाटकाचें वैशिष्ट्य आहे. यांतील साधी व सुबोध परंतु अत्यंत रसाळ अशी भाषा, पदांच्या उत्कृष्ट चाली, कथावस्तूची आकर्षक रचना, व नाट्यप्रयोगास लाभलेले मोरोबा वाघोलीकर, बाळोबा नाटेकर, भाऊराव कोल्हटकर वगैरे सुस्वर व अभिनय कुशल असे नट—यामुळें हें नाटक कमालीचें लोकप्रिय झालें. याच कथानकावर श्री. मा. वि. केळकरांनीं 'सुभद्राहरण' (१८७९), कृ. प्र. खाडिलकरांनीं 'त्रिदंडी संन्यास' व भा. वि. वरेरकरांनीं 'संन्याश्याचें लग्न' (१९४५) हीं नाटकें लिहिलेलीं आहेत.

अण्णा किर्लोस्करकृत 'सौभद्र' नाटकाचा पहिला प्रयोग 'किर्लोस्कर नाटक मंडळी'नें ता. १८ नोव्हेंबर १८८२ रोजीं रात्रौ पुण्यांतील अप्पा बळवंताच्या वाड्याजवळ त्या वेळीं असलेल्या 'पूर्णानंद' नाटकगृहांत करून दाखविला. हें नाटक गोष्टरूपानें पुढें दिलें आहे.

## सौभद्र : : नाटककार

### ब. पां ऊर्फ अण्णा किर्लोस्कर

"हा मूर्खा भरतकुलाधमा! धनंजयवीरास द्यायची असें म्हणावयाचें सोडून त्या अंधपुत्राचें नांव घेण्यास तुला शंका कशी रे नाहीं आली?"

द्वारकाधिपतीची भगिनी सुभद्रा व धृतराष्ट्रपुत्र सुयोधन यांचा विवाह द्वारकेंत होणार असल्याचें ठरलें होतें; व तो अपूर्व लग्नसोहळा पहावयास मिळावा म्हणून द्वारकेची वाट चालत असलेल्या एका जोडप्याच्या कानांवर वरील शब्द अचानकपणें आले. त्या दोघांनीं चमकून मागें वळून पाहिलें. त्यांच्या अंगावर खेंकसणारी व्यक्ति पहातांच तीं किंचित् दचकलींच. उंचापुरा, दणदाकट पण

डौलदार बांध्याचा, तोंडावर राजतेज असलेला, प्रवासी वेषांतला असा हा अनोळखी गृहस्थ आपल्यावर अकारण कां खेंकसतो आहे तें त्यांना कळेना. सुभद्रा-दुर्योधनविवाहाच्या आपल्या गप्पा ऐकून हा कां रागवावा हें त्यांच्या ध्यानांत येईना. 'असेल कुणीतरी एखादा पांडवांचा फाजील अभिमानी' अशी मनाची समजूत घालीत त्या जोडप्यानें तेथून चटकन पाय काढला.

तें गेल्यानंतरहि तो गृहस्थ हातवारे करीत, स्वतःशींच कांहीं पुटपुटत तेथें कितीतरी वेळ उभा होता. तो अशा स्थितींत असतांना दुरून त्याच्या कानावर वीणेचा मधुर स्वर पडला. थोड्याच वेळांत त्याच्यासमोर हरिभजन करीत असलेली नारदऋषींची स्वारी येऊन उभी राहिली. त्यांना पाहतांच तो गृहस्थ एकदम पुढे होऊन आदरानें वंदन करीत म्हणाला, "मुनिवर्य, आपणांस हा मध्यम पांडव पार्थ अभिवादन करतो आहे."

नारद : वत्सा धनंजया, तुझें इच्छित पूर्ण होवो.

अर्जुन : बरें पण मुनिवर्य, आपली स्वारी इतक्या गडबडीनें कुणीकडे निघाली आहे ?

नारद : वा अर्जुना ! द्वारकेंत व्हावयाच्या सुयोधन-सुभद्राविवाहाची तुला बातमीच नाहीं कीं काय ?

त्यावर अर्जुन एकदम अत्यंत खिन्न होऊन म्हणाला, "एकूण एकदां कानावर आलेली दुःखकारक वार्ता कधींहि खोटी व्हावयाची नाहीं !" नारदमुनींना त्याच्या या अचानक उद्विग्नतेचें कारण कळेना. त्याबाबत त्याला बरेंच खोदखोदून विचारल्यावर अर्जुनानें त्यांना खरी हकिगत सांगितली. सुभद्रेचा व त्याचा विवाह होण्याचें वडील मंडळींच्या सल्ल्यानें पूर्वींच ठरलें होतें. पांडव-कौरव वादामुळेंच केवळ तें लग्न किंचित् लांबणीवर पडलेलें होतें. अशा स्थितींत ही विवाहाची बातमी ऐकतांच अर्जुन पार खचून गेला. बरें, यांतून सुभद्रा मिळविण्याचा एकच मार्ग शिल्लक होता; व तो म्हणजे द्वारकाधिपती बलराम व श्रीकृष्ण यांच्याशीं झगडा करावयाचा! परंतु श्रीकृष्णानें आतांपर्यंत पांडवावर केलेले उपकार लक्षांत घेतां असा भलताच विचार त्याच्या मनांतहि येणें कधीं

शक्य नव्हतें. चोहोंबाजूंनीं निराशा झाल्यावर मनुष्यमात्राच्या मनांत शेवटीं जो एक भयानक विचार येतो तो अर्जुनाच्याहि मनांत आला. तो त्राग्यानें नारद-मुनींना म्हणाला, "महाराज, माझे प्रिय भ्राते जे धर्म, भीम, नकुळ आणि सहदेव त्यांना हा सर्व वृत्तान्त सांगून माझा शेवटचा निरोप असा कळवावा कीं—"

नारद : अरे, पण अशी निरवानिरव करून काय करण्याचें योजिलें आहेस ?

अर्जुन : महाराज, मी कोणत्याहि साधनानें प्राणत्याग करणार !

नारद : काय आत्महत्या !! आणि ती तुझ्यासारख्या क्षत्रियाकडून ? महत्पाप महत्पाप !! महत्पाप !!!

अर्जुन : तर मग संन्यास घेऊन कंदमूल सेवन करून कोठेंहि अरण्यांत पडून राहीन; पण या लोकांचा मला संबंध नको.

नारद : ही युक्ति बरी आहे; पण यांतहि एक खुबी आहे. माझ्यावर तुझा विश्वास असेल तर सांगतों.

अर्जुन : सांगा महाराज.

नारद : हें पहा, तूं जो संन्यास घेणार तो त्रिदंडी घे; म्हणजे प्रारब्धयोगानें तुझें इच्छित कार्य सिद्ध होण्याचा समय आलाच, तर तुला पुनः गृहस्थाश्रमी होतां येईल.

अर्जुन : ठीक आहे महाराज.

आणि त्यानंतर "तुझा विजय असो" असा शुभाशीर्वाद त्याला देऊन नारदमुनींनीं तेथून प्रयाण केलें.

नारदमुनींच्या आगमनानें व त्यांनीं केलेल्या उपदेशामुळें अर्जुनाला दुःखभार किंचित हलका झाल्यासारखें वाटूं लागलें. संन्यास घेण्यास योग्य स्थळ तो मनांतल्या मनांत शोधूं लागला. परंतु अशा विचारांत तो मग्न असतांना त्याला कोणीतरी मोठ्यानें खदखदां हंसल्याचा आवाज ऐकूं आला. तो चमकून इकडे तिकडे पाहूं लागला. जरा न्याहाळून पहातां त्याला एक अत्यंत भयंकर दृश्य दिसलें. एका प्रचंड वटवृक्षाखालीं एक अजस्र, राक्षसासारखा दिसणारा पुरुष आपल्या खांद्यावर एका अत्यंत सुस्वरूप अशा तरुण स्त्रीला घेऊन उभा होता. नभोमंडळांत एखाद्या प्रचंड, अक्राळविक्राळ अशा काळ्या मेघाच्या

शरीरावर अधूनमधून चमकणाऱ्या तेजस्वी विद्युल्लतेप्रमाणें ती त्याच्या अंगावर भासत होती. कांहींतरी दुष्ट हेतूनें त्या निशाचरानें या सुंदर स्त्रीचें हरण केलेलें असावें हें अर्जुनानें ताबडतोब ओळखिलें. क्षत्रियधर्माप्रमाणें या स्त्रीस संकटमुक्त करणें हें आपलें कर्तव्य आहे असा मनाशीं निर्णय करून त्यानें ताबडतोब मोठ्या त्वेषानें आपल्या भात्यांतून एक बाण काढून तो धनुष्यावर सज्ज केला व त्या निशाचराला मोठ्यानें आरोळी ठोकून ' द्वंद्वा'चें आव्हान दिलें. आव्हान न स्वीकारतां पळून जाण्याचा त्याचा बेत दिसतांच अर्जुनानें त्याच्या मांडीवर एक बाण मारून त्याला घायाळ केलें. त्याबरोबर त्या स्त्रीला तेथें तशीच टाकून तो राक्षस क्षणार्धांत तेथून दिसेनासा झाला. त्याचा पाठलाग करण्याच्या भानगडींत अर्जुन पडला नाहीं; कारण त्या स्त्रीला तेथें अरण्यांत एकटें टाकणें त्याला धोक्याचें वाटलें. त्या स्त्रीची वास्तपुस्त करून तिला इष्ट स्थळीं पोहोंचवावी असा हेतु मनांत धरून तो तिच्याकडे वळला. परंतु त्या स्त्रीला या सर्व प्रकाराची कांहींच कल्पना नसावी. ती स्वतःशींच कांहींतरी बडबडत व गुणगुणत होती ..."काय ? मी माझ्या महालांत ना निजलें होतें ? आणि या पल्लवशय्येवर कशी आलें ?...हा समजलें. या अंतःकरणांतल्या विरहव्यथेंतून मुक्त करण्याकरितां माझ्या दासींनीं ह्या शीतल पल्लवशय्येवर मला निजवलेलें दिसतें...पण कुणीतरी मेलीनें जवळ असावें कीं नाहीं!...देवा! काय मजवर कहर चालविला आहेस ?" आणि नंतर ती स्वतःशींच गुणगुणूं लागली—

राजा लुटी जरि प्रजाजनाला । माता मारी निज बाळाला ॥
बंधु विकी जरि निजभगिनीला । शरण कुणा जावें ॥

मेल्या फुटक्या नशिबा! किती प्रकारांनीं मला वेढलें आहेस...बरें ज्यांच्या जिवावर मीं आप्त, इष्ट, भाऊ तुच्छ मानले त्यांचा तरी ठिकाण कोठें आहे ?

पांडुकुमारा पार्थ नरवरा राखा वचनाला ।
निश्चय माझा न ढळे जरि हा कंठ कुणीं चिरला...॥"

ही तिची चमत्कारिक बडबड ऐकून अर्जुन कमालीचा गोंधळला. त्यानें तिच्याकडे जरा निरखून पाहिलें. तिचें तोंड दृष्टीस पडतांच तिच्या सर्व बडबडीची

त्याला चटकन् संगति लागली. ती तरुण सुंदर स्त्री म्हणजे जिच्यापायीं तो आपला क्षात्रधर्म सोडून त्रिदंडी संन्यास घेण्यास प्रवृत्त झाला होता ती सुभद्राच होती! हर्षातिरेकानें तो चटकन् पुढें झाला. परंतु प्रवासी वेषांतल्या अर्जुनाला सुभद्रेनें बिलकुल ओळखिलें नाहीं. शिवाय गेल्या कित्येक वर्षांत तिनें अर्जुनाला पाहिलेलेंच नव्हतें. सुभद्रेनें त्याला विचारिलें, "कोण हवं आहे आपल्याला? आणि असा भयंकर वेष धारण करून आपण माझ्या अंतःपुरांत प्रवेश कां केलांत?" अर्जुन त्यावर किंचित् थट्टेनें म्हणाला, "हे चारुगात्री, मी एक तीर्थयात्रा करणारा प्रवासी आहें. आणि तूं सध्यां अंतःपुरांत नसून एका घोर अरण्यांत आहेस."

सुभद्रा : काय मी घोर अरण्यांत आहे? मला इथें कुणी आणली?

अर्जुन : तें कसें काय झालें असेल हें मला सांगवत नाहीं.

आपण एका अरण्यांत एका अपरिचित पुरुषाच्या सान्निध्यांत आहोंत याची जाणीव होतांच सुभद्रा अगदीं खचून गेली. ती स्वतःशींच म्हणाली, "हाय हाय! हें कांहीं माझ्यानें सहन करवत नाहीं. दादा, वहिनी आदिकरून सर्वजण मला म्हणतील, तूं खास मुहूर्त चुकविण्याकरितां हें साहस केलेंस. देवा, हा विनाकारण मजवर कलंक आला ना?—" असें बोलतां बोलतांच एकदम मूर्च्छा येऊन ती धाडकन् जमिनीवर कोसळली. अर्जुनानें चटकन् तिला सांवरली. तिला शुद्धीवर आणण्याकरितां तो प्रयत्न करूं लागला परंतु तिला जबर मूर्च्छा आलेली होती. आसपास कोठें पाणी आहे का म्हणून तो पाहूं लागला. परंतु तेथें पाण्याचा कांहीं मागमूसहि त्याला आढळेना. शेवटीं तिला तेथें तशीच एकटीला ठेवून पाण्याच्या शोधार्थ निघणें त्याला भाग पडलें. जाण्यापूर्वीं त्यानें तिच्या अंगावर जवळचा एक शेला आच्छादन म्हणून घातला. त्या स्थळापासून बऱ्याच अंतरावर त्याला अखेर एक छोटासाच परंतु अत्यंत स्वच्छ असा जलप्रवाह दिसला. घाईघाईनें त्यानें आपला कमंडलु भरून घेतला व सुभद्रेला जेथें ठेविलें होतें त्या ठिकाणीं तो परत आला. परंतु तेथें सुभद्रा त्याच्या दृष्टीस पडेना. या

प्रकारानें त्याचें मन अगदीं सुन्न होऊन गेलें. त्याला वाटलें, ' आपण स्वप्नांत तर नाहीं ना ? ' सुभद्रेला ज्या ठिकाणीं ठेविलें होतें तें ठिकाण तो निरखून पाहूं लागला. तेथें एक अत्यंत मूल्यवान् अशी रत्नमाला व एक थैली त्याला आढळली. ती रत्नमाला त्यानें तावडतोब ओळखिली. कारण त्यानेंच स्वतः द्वारकेंत असतांना सुभद्रेला ती भेट म्हणून दिली होती. नंतर त्यानें ती थैली उघडून पाहिली. थैलींत एक पत्र होतें. पत्रांत पुढीलप्रमाणें मजकूर होता—

> " श्रीमत्सकलगुणैश्वर्यमंडित मत्प्राणवल्लभ पार्थराज यांच्या चरणकमलीं ही गीतिद्वारा विज्ञापना अर्पण असो.
>
> शशिकुलभूषण सदया ॥ मत्प्राणेश्वरा विजया ॥ विनवी ही तव जाया ॥ मान्य कराया ॥ १ ॥ अर्पियिली ही काया ॥ तव चरणीं पतिराया ॥ ठाउक असुनी हें सखया ॥ त्यजिली कां माया ॥ २ ॥ मज दुर्योधन-हातीं ॥ द्याया निश्चय करिती ॥ बंधू ते नायकिती ॥ बघतां अंत किती ॥ ३ ॥ समयीं नाहीं आलां ॥ देईन मी प्राणाला ॥ धाडियलीसे माला ॥ खूण तुम्हांला ॥ ४ ॥ रिपु नेतां भार्येसी ॥ सुचली यात्रा कैसी ॥ या होउनि संन्यासी ॥ न्या मज संवेसी ॥ ५ ॥

तें पत्र वाचून अर्जुन स्वतःशींच अगदीं मनापासून हंसला. ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ व संन्यास हे चारी आश्रम तिशीच्या आंतच उरकले जाण्याचा योग यावा या चमत्काराचें त्याला कमालीचें हंसूं आलें !

× × ×

त्या दिवशीं रैवतक पर्वतावरील एका गुहेजवळ द्वारकस्थांची बेसुमार गर्दी उसळली होती. ज्या गुहेस जावयाला पूर्वीं पाऊलवाट सुद्धां नव्हती, तेथें बारा हात रुंदीचा रस्ता लोकांच्या जाण्यायेण्याच्या वर्दळीनें झाला होता. हिमालयावरून संचाराकरितां बाहेर पडलेल्या कोणा एक थोर योगी पुरुषानें त्या गुहेंत आपलें प्रस्थान नुकतेंच ठेविलें होतें. ते आल्याची बातमी कळतांच यादवकुलगुरु गर्गमुनि हे स्वतः आपल्या शिष्यगणांसह योगीमहाराजांच्या गुहेंत गेले व त्यांच्या पायांवर

साष्टांग नमस्कार घालून त्यांच्यापुढें हात जोडून उभे राहिले. ही बातमी शहरांत कळतांच टोळधाडीप्रमाणें लोकांचे थवेच्या थवे तेथें कोसळले. कोणी संतति, कोणी संपत्ति, कोणी आरोग्य अशाविषयीं स्वामींस विचारताहेत; कोणी नुसतें दर्शन घेऊन कांहीं फळफळावळ पुढें ठेवताहेत; असा एकच धुमाकूळ तेथें माजून राहिला. या गर्दीत राजवाड्यांतील विदूषक नांवाचा एक ब्राह्मण आश्रितहि हजर होता. त्यानें धांवत जाऊन ह्या सर्व प्रकाराची माहिती श्रीकृष्णाच्या व बलरामाच्या कानावर घातली. बलरामाच्या भाविक मनाला ती बातमी ऐकून अत्यंत आनंद झाला. कारण या वेळीं तो सुभद्रेच्या चिंतेंत होता. सुभद्रा एक प्रहर महालां-तून नाहींशी झाली व परत पूर्व ठिकाणावर पहिल्यासारखीच निजलेली आढळली ह्या नुकत्याच घडलेल्या घटनेमुळें तो अतिशय अस्वस्थ झाला होता. स्वतः सुभद्रेलाहि खरा प्रकार काय झाला याची कल्पना नव्हती. शेवटीं या विलक्षण प्रकाराचा उलगडा गर्गमुनींनीं पुढीलप्रमाणें केला. ते म्हणाले कीं, यक्षकिन्नर जातीपैकीं यक्षिणी ह्या मोठ्या प्रबल आणि मायावी स्त्रिया अंतरिक्षांत वास करीत असतात. त्या अशा एखाद्या सुंदर राजकन्येच्या विवाहाच्या वेळीं असा चमत्कार करीत असतात. परंतु त्यांत त्यांचा हेतु कांहीं वाईट नसतो. मात्र अशा प्रसंगीं त्यांचा वधूकडील अथवा वराकडील पक्षावर कांहीं पूर्वीलसंबंधानें कोप असतो. तेव्हां त्यांची कांहींतरी शांति उभयपक्षाकडून झाली म्हणजे पुढील मुहूर्तीं असें विघ्न येत नाहीं. ही शांति कशी करावी ह्या विवंचनेंत बलराम असतांनाच गर्गमुनींचा एक शिष्य तेथें आला व त्यानें त्यांचा पुढीलप्रमाणें निरोप सांगितला. "रैवतक पर्वताच्या गुहेंत कोणी एक महासमर्थ वैराग्यशाली असा यति येऊन राहिला आहे. त्याचें चरणतीर्थ व त्याच्याजवळून तयार करून घेतलेला एक ताईत पाठवीत आहें. हें तीर्थोदक सुभद्रेच्या देहावर सिंचन करावें व ताईत तिच्या उजव्या हातांत बांधावा, म्हणजे ती सर्व भयापासून मुक्त होऊन तिची प्रकृति पूर्ववत् होईल." बलरामानें मुनींच्या सल्ल्याप्रमाणें सर्व गोष्टी केल्याच परंतु शिवाय तो स्वतः सुभद्रेला व कृष्णाला घेऊन यतिमहाराजांच्या दर्शनाला गेला. दर्शन घेऊन परत आल्यावर तो कृष्णाला म्हणाला, "कृष्णा, या महात्म्या

यतीच्या: दर्शनानें माझें अंतःकरण कसें आनंदभरित होऊन गेलें आहे पहा. अशा साधूचा सहवास जर नेहमीं घडेल तर, या प्रपंचांतील दुःखें कधीं भासणार नाहींत. कृष्णा, या यतीविषयीं माझ्या मनांत एक विचार आला आहे.

कृष्ण : तो कोणता ?

बलराम : हें पहा, ही आपली सुभद्रा, पूर्वी किती बरें माझ्या आज्ञेंत वागत होती ? परंतु अलीकडे तिचा एक चमत्कारिकच हट्टी स्वभाव झाला आहे; तेव्हां तिला या यतीच्या सेवेला लावावी, म्हणजे सुबुद्धि उत्पन्न होऊन तिच्या कल्याणाकरितां आम्हीं तिला दुर्योधनाला देण्याचें ठरविलें आहे, त्याला ती आनंदानें मान्य होईल. यास्तव या यतिमहाराजांना सुभद्रेच्या अंतर्गृहांतच ठेवावें म्हणजे तिला सेवा करण्यास बरें पडेल.

कृष्ण : ठीक, ठीक ! फार चांगलें ! ! दादा, या गोष्टीला मात्र मी अगदीं कबूल नाहीं. काय सुभद्रेच्या मंदिरांत त्या यतीची स्थापना करणार ? चोराच्या हातीं जामदारखान्याची किल्ली देण्यासारखेंच हें आहे !

बलराम : ( त्वेषानें ) काय करूं रे ! तुझे हे शब्द माझ्या कानाला तापलेल्या तेलाप्रमाणें त्रास देतात ! अरे, तूं यःकश्चित् पापमय मनाची आणि त्या महायोग्याच्या अंतःकरणाची योग्यता सारखीच समजून, अशा कुत्सित कल्पना करतोस काय ? धिक्कार असो तुला ! !

कृष्ण : दादा तुम्ही कांहीं म्हणा; परंतु सुभद्रेला त्या यतीच्या सहवासांत नेहमीं ठेवणें हें कांहीं प्रशस्त नव्हे; यापासून काय घोटाळा होईल हें कांहीं माझ्यानें सांगवत नाहीं.

बलराम : बरें होऊं दे ! माझा जो निश्चय झाला तो कांहीं ढळावयाचा नाहीं.

कृष्ण : मर्जी आपली. माझें काम सुचविण्याचें तें मीं केलें. आतां पुढें मागें मजवर कांहीं बोल यायचा नाहीं.

आणि त्यानंतर दुसरेच दिवशीं रैवतक पर्वतावरील त्या 'विरक्त यतिमहाराजांना' मोठ्या थाटामाटांत, वाजतगाजत राजवाड्यांत आणण्यांत आलें. त्यांचें स्नान, पूजा, जपजाप्य, ध्यान वगैरे गोष्टी अगदीं निर्विघ्नपणें पार पडा-

ण्यात म्हणून त्यांना मुद्दाम राजवाड्यांतील जरा बाजूची—परंतु सुभद्रेच्या महालाला अगदीं लागून असलेली— एक अत्यंत सोईस्कर अशी जागा देण्यांत आली. त्यांच्या सेवेला स्वतः सुभद्रा जातीनें अष्टौप्रहर हजर असे. यतिमहाराज आपल्या आश्रमाला अनुसरून जरा छांदिष्टच होते ! सेवेंत जरा इकडे तिकडे कांहीं थोडेंसें बिघडलें कीं आरडाओरड करून ते आकाशपाताळ एक करीत. त्यामुळें त्यांच्या सेवेला असलेले दासदासी लवकरच अगदीं कंटाळून गेले. हा चातुर्मास संपून हे यतिमहाराज येथून केव्हां जातात असें त्यांना होऊन गेलें ! परंतु सुभद्रा मात्र यतिमहाराजांच्या या सर्व जिकीरींमुळें यत्किंचितहि न कंटाळतां अत्यंत मनापासून व उल्हासानें त्यांची सेवा करीत होती. आणि यतिमहाराजहि सुभद्रा आसपास असली म्हणजे फारशी जिकीर करीत नसत. बलरामहि यतिमहाराजांवर अतिशय प्रसन्न होता. कारण त्यांना राजवाड्यांत आणण्यांतील त्याचा उद्देश बराच सफल झाला होता. यतिसेवेंत गुंतल्यामुळें सुभद्रा आपलें स्वतःचें दुःख पार विसरून जाई. तिचा त्रागा, चिडकेपणा बराच कमी झाला होता. आणि यामुळें तिची प्रकृतिहि बरीच सुधारून तिच्या तोंडावर पूर्वींची प्रसन्नता दिसूं लागली होती.

एके दिवशीं कांहीं कामानिमित्त सुभद्रा बाहेर गेलेली असल्यानें तिच्या दोन दासी—कुसुमावती व सारंगनयना—ह्या यतिमहाराजांकरितां पूजासाहित्य तयार करीत होत्या. यतिमहाराजांचें स्नान होऊन ते ध्यानस्थ बसले होते. ते ध्यानस्थ बसलेले असतांना तेथें कोणी जाऊं नये अशी आज्ञा असल्यानें त्या दोघी बाहेरच उभ्या होत्या. तेवढ्यांत तेथें रुक्मिणी आली. ती बऱ्याच गडबडींत असलेली दिसत होती. आल्याबरोबर ती घाईघाईनें कुसुमावतीस म्हणाली, " अग, कुसुमावती, तूं इथें हात जोडून कां उभी ? वाड्यांत काय गडबड चालली आहे हें तुला ठाऊक नाहींसें दिसतें ? "

कुसुमावती : नाहीं बाईसाहेब. आज सकाळपासून मी इकडेच आहें.

रुक्मिणी : अग, वन्संच्या लग्नाचा दिवस ठरला. आज इकडलें केळवण आणि देवकार्य आटपून टाकावें अशी गुरुजींची आज्ञा आहे, तर तूं वन्संना न्हाऊं घालायला जा.

कुसुमावती : तर मग ताईसाहेब स्वामीमहाराजांच्या सेवेला आज इकडे यायच्या नाहींत ?

रुक्मिणी : अग छे; त्यांना आतां इकडे यायला वेळ कुठें आहे ? गुरुजींनीं सांगितलें कीं, झाली तितकी सेवा पुरे आहे. उद्यां महापर्वणी आहे तेव्हां सर्व मंडळी समुद्रस्नानाला जायची तेथेंच स्वामींच्या चातुर्मास्याची सांगता करून त्यांस तिथूनच निरोप द्यावा.

कुसुमावती : पण बाईसाहेब, अजून हस्तिनापुराहून वऱ्हाडी मंडळी आली नाहीं नी केळवणाची गडबड कां केली हें कळत नाहीं.

रुक्मिणी : अग खुळे, इथें एकदां लग्नाला विघ्न आलें म्हणून तें हस्तिनापुरांतच व्हावें असें दुर्योधनाचें म्हणणें पडलें आहे; यास्तव सर्व मंडळी तिकडेच जायला परवांच निघणार. मग नको का इथलें केळवण आजच करायला ? असो; तूं जा आतां, तिकडे खोळंबा झाला असेल. वन्सं कांहीं तुझ्यावांचून दुसऱ्याला अंगाला हात लावूं देणार नाहींत.

कुसुमावती : ही मी चाललें; पण इथें यांच्याजवळ कोणी नाहीं.

रुक्मिणी : तूं जा, मी इथें यांच्या सेवेला राहतें.

कुसुमावती गेल्यावर रुक्मिणीनें आंत डोकावून पाहिलें. स्वामीजींची समाधी उतरलेली दिसली. ' आपलें कुसुमावतीशीं झालेलें संभाषण यांनीं ऐकलें तर नाहीं ना ? ' या पुसट्या शंकेनें रुक्मिणी किंचित् ओशाळली होती; परंतु तरीदेखील मनाचा हिय्या करून ती अत्यंत अदबीनें यतिमहाराजांजवळ गेली व हात जोडून म्हणाली, " महाराजांची काय इच्छा असेल ती कळवावी, मी सेवा करण्यास तयार आहें. "

यतिमहाराज हातांतील गोमुखी आपटत एकदम मोठ्यानें कडाडले, " आग लागो तुझ्या सेवेला आणि ती दुःखकारक वार्ता उच्चारणाऱ्या त्या वाणीला ! हें पहा, तूं इथून निघून गेलीस म्हणजे माझी सेवा तूं चांगली केलीस असें मी समजेन ! "

यतिमहाराजांच्या या अचानक कोपाचें कारण रुक्मिणीला कळेना. ती

मनाशीं म्हणाली, " वन्संचं लग्न ठरलं या बातमीनें या विरक्त यति महाराजांना येवढा संताप कां यावा ? सुभद्रेचा पार्थाशीं विवाह झाला काय किंवा सुयोधनाशीं झाला काय—ह्या संन्याश्याला त्याचं सुखदुःख असण्याचं कांहींच कारण नाहीं. " ती अशा विचारांत मग्न असतांना सारंगनयना तेथें आली व स्वामीजींपुढें हात जोडीत त्यांना म्हणाली, " महाराज, यादवसेनेचे अधिपति सात्यकीमहाराज आपल्या दर्शनाकरितां आले आहेत. आज्ञा होईल तर त्यांस आंत घेऊन येतें. " त्यावर यतिमहाराजांनीं ' येऊं दे ' या अर्थाची मान हालवून संमती दिल्याचें पाहून ती बाहेर जाऊन सात्यकीस आंत घेऊन आली. सात्यकीनें आंत येतांच यतिमहाराजांपुढें साष्टांग नमस्कार घातला. महाराजांनीं हात वर करून आशीर्वाद दिल्यावर तो उठून उभा राहिला व हात जोडून म्हणाला, " महाराज, दादासाहेबांची चरणापाशीं अशी प्रार्थना आहे कीं, उद्यांइक महापर्वणी असल्यामुळें सर्व नागरिकजनांसहवर्तमान समुद्रतीरीं स्वारी जाणार; वनभोजन आटपल्यावर सायंकाळीं स्वारी परत येणार; तेव्हां आपली येण्याची इच्छा असल्यास ताईसाहेबांस नेण्याची तजवीज करतां येईल, व आपणांस येण्याचें नसेल तर त्यांस इथेंच ठेवितां येईल.

यति : वाः तुम्ही सर्व समुद्रस्नानास जाणार आणि मला इथें राहून काय करायचें आहे ! मी मोठ्या आनंदानें येणार. मात्र त्या जनसमुदायाचा संपर्क आम्हांला न होईल अशी तजवीज राहिली पाहिजे.

सात्यकी : तो बंदोबस्त मी ठेवीन. त्या ठिकाणीं ताईसाहेब व त्यांचे थोडे सेवक यांशिवाय कोणी आपल्या नजरेस पडणार नाहीं.

यति : फार उत्तम आहे.

सात्यकी : मी निरोप घेतों. ( असं म्हणून साष्टांग नमस्कार करितो. )

यति : नारायण.

सात्यकी निघून गेल्यावर यतिमहाराज बरेच विचारमग्न झालेले दिसले. उलटसुलट विचारांचें कांहीं तरी प्रचंड वादळ त्यांच्या मनांत चालल्याचें त्यांच्या मुद्रेवरून स्पष्टपणें दिसत होतें. विचारमग्न झाल्यानें मिटलेले डोळे उघ-

ढून त्यांनीं सहज वर पाहिलें तो सर्वजणी आपल्याकडे कुतूहलानें पहात असल्याचें त्यांच्या लक्षांत आलें. त्याबरोबर आपली नेहमींची विकारशून्य मुद्रा धारण करीत ते कुसुमावतीस म्हणाले, "अग माझी माध्यान्हस्नानाची तयारी करण्यास सांग जा, मी आतां तिकडेच येतों."

ही आपणाला बाहेर जाण्याची सूचना आहे हें तावडतोब साऱ्यांच्या ध्यानांत आलें व त्या सर्वजणी त्यांच्या स्नानाची तयारी करण्याच्या निमित्तानें तावडतोब बाहेर पळाल्या.

दुसऱ्या दिवशीं ठरल्याप्रमाणें राजवाड्यांतील सर्व आतेष्टांना व निवडक सेवकांना घेऊन बलराम व कृष्ण हे समुद्रस्नानास गेले. नागरिकांचा उपद्रव होऊं नये म्हणून यतिमहाराजांची स्नानाची व्यवस्था निराळ्याच बाजूला केली होती. त्यांच्या सेवेला सुभद्रा व तिच्या कुसुमावती व सारंगनयना या दोन दासी देण्यांत आलेल्या होत्या. स्नान झाल्यावर यतिमहाराज नित्यनियमाप्रमाणें कांहीं काळ ध्यानस्थ बसले. ध्यान विसर्जन झाल्यावर ते सुभद्रेला म्हणाले, "सुभद्रे, या समुद्रतीरीं जो रैवतक पर्वत दिसत आहे, त्यावर जाऊन जर आपण पाहूं लागलों तर यापेक्षांहि विशेष मौज यावेळीं दिसणार आहे."

सुभद्रा : पूर्वी आपण या पर्वतावरील ज्या गुहेंत बसलां होतां ती मला दाखविण्याचें जर कबूल कराल तर मी येईन.

यति : हो हो; ती गुहा येथून जवळच आहे.

सुभद्रा : ठीक आहे, चलावें तर.

आणि मग त्या दोघांनीं बरोबरच्या दासदासींना जरा वेळ रजा दिली व तीं दोघेंच रैवतक पर्वत चढूं लागलीं. अवघड चढ व तेढी वाट यामुळें सुभद्रा लवकरच अगदीं थकून गेली. असल्या श्रमांची त्या नाजुक राजकन्येला बिलकूल सवय नव्हती. शेवटीं कशीं बशीं तीं दोघें त्या गुहेच्या तोंडापाशीं येऊन पोंहोंचलीं. तेथें रानवेलींचा एक सुंदर मांडव दिसत होता. श्रमपरिहारार्थ तीं दोघेंहि त्याच्या शीतल छायेंत जरा वेळ बसलीं. बराच वेळ झाला तरी सुभद्रा कांहींच बोलेना हें

पाहून यतिमहाराज सुभद्रेला म्हणाले, "सुभद्रे, अशीं स्तब्ध कां बसलीस ?"

सुभद्रा : महाराज, आपणांस कांहीं विचारायचें मनांतून आहे, परंतु—

यति : तुला काय विचारायचें असेल तें खुशाल विचार, मला कांहीं राग यायचा नाहीं.

सुभद्रा : महाराज, ऐन तरुण वयांत आपणांस असें वैराग्य उत्पन्न होण्यास निमित्त काय झालें तें सांगावें अशी विनंती आहे.

यावर एक दीर्घ निःश्वास टाकून यतिमहाराज म्हणाले, "काय सांगूं तुला सुभद्रे !—माझ्या मातुल घराण्यांतल्या एका मुलीशीं माझा विवाह होण्याचें निश्चित ठरलें होतें. या गोष्टीला तिच्या वडील बंधूंचीहि मान्यता आम्ही मिळविली होती. परंतु पुढें काय झालें कुणास ठाऊक पण एक दिवस अचानकपणें त्यांनीं मला कांहीं एक न कळवितां तिचा परस्पर दुसऱ्या एका तरुणाशीं विवाह ठरवून टाकला !

सुभद्रा : अगबाई, काय तरी चमत्कार हा !—बरं पण त्यानंतर तुमच्या त्या मातुलकन्येनें आपला तो निश्चय तसाच टेविला कीं बंधूंप्रमाणें तीहि फिरली ?

यति : छे छे. तिच्या मनावर या गोष्टीचा फारच विपरीत परिणाम झाला. तिनें त्या दिवसापासून अगदीं अन्नपाणीहि वर्ज केलेन् !

सुभद्रा : अगबाई, आणि मग पुढें ?

यति : पुढें काय व्हायचें ? जसजसा माझ्याविषयीं तिचा आग्रह वाढत चालला, तसतसा तिच्या बंधूंचाहि मला ती न देण्याविषयीं हट्ट वाढूं लागला. तेव्हां मला विरक्तता उत्पन्न होऊन मी संन्यास घेऊन तीर्थयात्रा करूं लागलों.

सुभद्रा : स्वामीमहाराज, तुमचें चरित्र अगदीं माझ्या कथेसारखेंच असल्यानें तुम्ही व मी समदुःखी आहोंत; मात्र अंतर एवढेंच कीं तुम्ही संन्यास घेऊन दुःखमुक्त झालांत, आणि मी मात्र या दुःसह तापाग्नींत तशीच जळत आहें !

यति : सुभद्रे, तुझी आणि माझी कथा सारखीच म्हणतेस तें कसें काय तें सांग.

सुभद्रा : पूर्वाश्रमींची तुमची जी मातुलकन्या तीच मी असें समजा, म्हणजे मला कशा प्रकारचें दुःख आहे हें कांहीं सांगायला नको.

यति : तें झालें, पण माझी मातुलकन्या ज्याच्याकरितां दुःख करीत होती तसें तुझें कोण आहे ?

सुभद्रा: महाराज, पऽ ण—

यति : सुभद्रे, अगदीं निःशंकपणें मला त्या भाग्यशाली तरुणाचें नांव सांग.

सुभद्रा : महाराज, मी मनानें मध्यम पांडव—

यति : कोण पार्थ ?

सुभद्रा : होय महाराज, त्यांनाच मी मनानें वरलें आहे, आणि जर त्यांना सोडून दुसऱ्या कोणाशीं विवाह करण्याची माझ्यावर सक्ती झाली तर—

यतिः सुभद्रे, नको कांहीं तरी अभद्र बोलूं. तुझ्या दृढ निश्चयाचें फल सर्वेश्वर दिल्यावांचून कधीं राहणार नाहीं.

सुभद्रेचा तो निश्चय ऐकून कां कुणास ठाऊक परंतु यतिमहाराज कमालीचे आनंदित झालेले दिसले. त्या प्रश्नोत्तरांनंतर बराच वेळ त्या दोघांपैकीं कोणीहि कांहींच बोललें नाहीं. त्या दोघांच्याहि मनांत त्यावेळीं कांहींतरी प्रचंड खळबळ चालल्याचें त्यांच्या मुद्रेवरून स्पष्ट दिसत होतें. कांहीं वेळानें एकदम कांहींतरी आठवल्यासारखें करीत सुभद्रा म्हणाली, "यतिराज, या गुहेंतून हिंडून पाहून यावें अशी मला इच्छा झाली आहे, तर आंत जाऊन पाहून येऊं का ? कांहीं श्वापदादिपदार्थांचें भय नाहीं ना ?"

यति : येथें तसें कांहीं भय नाहीं; खुशाल जाऊन पाहून ये.

सुभद्रा : मी जाऊन येतें तोंपर्यंत आपण या मंडपांत बसावें.

कांहीं वेळानें सुभद्रा एका हातांत एक गांठोडें व दुसऱ्या हातांत एक धनुष्य-बाण अशा थाटांत त्या गुहेंतून बाहेर आली. किंचित् संशयी दृष्टीनें यति-राजांकडे पहात ती म्हणाली, "महाराज, या गुहेंतील अगदीं शेवटल्या कोपऱ्यांतील कोनाड्यांत मला हें सांपडलें. तेव्हां हें काय आहे तें पहा" त्यावर तिच्या नजरेला नजर न देतां ते म्हणाले,

"सुभद्रे, ह्या सर्व वस्तु कोणातरी राजपुत्राच्या असाव्यात."

सुभद्रा : पण यतिमहाराज, हीं सुंदर भूषणें व वस्त्रें माझ्या दृष्टीखालून गेलीं असावींत असें वाटतें; पण अमुकच प्रसंगीं हें कांहीं आठवत नाहीं.

यति : तुझ्या त्या अर्जुनाचीं तर नव्हेत ? कारण तो वेषांतर करून तीर्थयात्रेस गेला असें मीं ऐकिलें आहे.

यतिराजांचा हा अचानक प्रश्न ऐकून सुभद्रा अगदीं गांगरून गेली. तिच्या मनाला एक चमत्कारिक कल्पना चटकन् चाटून गेली. पदराच्या टोंकाशीं चाळा करीत किंचित् कांपऱ्या आवाजांत ती त्यांना म्हणाली, " महाराज, मला एक इच्छा उत्पन्न झाली आहे, ती आपण पूर्ण केली पाहिजे. "

यति : तुला आज निरिच्छ करून सोडतों. काय तें बोल म्हणजे झालें.

सुभद्रा : महाराज, मी आपणाला देवाप्रमाणें पूज्य मानून आपली सेवा करीत आहें आणि भक्त जसे आपल्या देवाला निरनिराळे पोषाख देऊन दर्शन घेतात तद्वत् हा पोषाख आपणावर घालून आपलें दर्शन घ्यावें अशी मला इच्छा उत्पन्न झाली आहे.

यति : सुभद्रे, आज तुझ्या इच्छेप्रमाणें होऊं दे.

असें म्हणून यतिराज तें गांठोडें घेऊन गृहांत गेले व कांहीं वेळानें बाहेर आले. राजपुत्राच्या पोशाखांत यतिराजांना पहातांच सुभद्रा अगदीं चकित होऊन गेली. मध्यम पांडव जो पार्थ त्याच्याप्रमाणें ते हुबेहुब दिसत होते. सुभद्रेनें पुन्हां एकदां त्यांच्याकडे निरखून पाहिलें व मग तिची जवळ जवळ खात्रीच झाली कीं हे यतिराज म्हणजे संन्यास घेऊन तीर्थयात्रा करीत हिंडत असलेला अर्जुनच असावा. परंतु मनाची खात्री करून घेण्या-करितां तिनें आणखी एक डाव टाकून पहाण्याचें ठरविलें. ती त्यांना म्हणाली, "यतिराज, आतां हा शेला अंगावर घ्यावात." तिनें दिलेल्या शेल्याकडे अत्यंत आश्चर्यानें पहात यतिराज म्हणाले, " अरे, काय तरी चमत्कार हा? ज्या शेल्यावर स्वतः कशिदा काढून मध्यें माझें नांव घालून माझ्या मातुलकन्येनें मला पूर्वीं दिला होता तोच हा शेला. पण सुभद्रे, हा तुझ्यापाशीं कसा आला ? "

सुभद्रा : ती स्त्रीच आपली मातुलकन्या असेल म्हणून हा शेला आला असेल.

यति : सुभद्रे, तूं काय म्हणतेस तें कांहीं मला कळत नाहीं. पण तें असो. तूं माझा अति प्रिय शेला मला दिलास याजकरितां तुलाहि मी कांहीं बक्षीस देतों. ही घे रत्नमाला. "

असें म्हणून त्यांनीं एक बहुमूल्य रत्नमाला तिच्या हातांत दिली. त्या रत्नमालेकडे आश्चर्यातिरेकानें पहात सुभद्रा म्हणाली, "अगबाई, जी माझ्या प्राण-पतींनीं पूर्वीं मला प्रेमानें दिली होती तीच ही रत्नमाला ! पण आपल्यापाशीं ही कशी आली ?"

यति : ह्या शेल्यासारखीच !

सुभद्रा : अगबाई, म्हणजे आहे तरी काय ही सारी भानगड ?

तिचा हा आश्चर्योद्गार पुरा होतो आहे न होतो तोंच त्यांच्या कानांवर कोणी तरी खूप मोठ्यानें हांसल्याचा आवाज ऐकूं आला. आवाजाच्या रोखानें तीं दोघें पाहूं लागलीं. एका झुडपाआडून मार्ग काढीत श्रीकृष्णाची स्वारी येत असलेली त्यांना दिसली. त्याला पहातांच तीं दोघेंहि चपापून दूर सरलीं. त्यांच्याजवळ येऊन पोहोंचल्यावर त्या दोघांच्याकडे मिस्कीलपणें पहात श्रीकृष्ण पुन्हां एकदां मनापासून हंसला. नंतर त्या दोघांना तेथील एका शीलाखंडावर बसवीत तो म्हणाला, "हें पहा, असे भांबावल्यासारखे माझ्याकडे पाहूं नका. हें सगळं शेला, थैली आणि राक्षस प्रकरण काय आहे तें मी तुम्हाला सारें समजावून सांगतों. या साऱ्या भानगडींचें कर्तृत्व माझ्याकडे आहे !"

" काय तूं हें केलंस सारं ?" तीं दोघेंहि एकाच वेळेला ओरडलीं.

" होय ताईसाहेब व पार्थराज—नाहीं चुकलं यतिराज ! " कृष्ण शांतपणें म्हणाला.

" अगबाई, म्हणजे हे यति नाहींच वाटतं ? " सुभद्रा तोंडावर आश्चर्याचा आव आणीत म्हणाली.

" अरे वा ताई, बतावणी तरी खूपच करते आहेस. जसं कांहीं तूं या अर्जुनाला अजून ओळखलंच नाहींस अं ? " त्याचा तो प्रश्न ऐकून सुभद्रा लाजून अगदीं चूर झाली. तिनें यतिराजांकडे ऊर्फ अर्जुनाकडे एकदां हळूच

चोरून पाहिलें. अर्जुन ओशाळी मुद्रा करून तिची नजर चुकविण्याच्या प्रयत्नांत असलेला तिला दिसला.

" हे बघ पार्था, " अर्जुनाच्या खांद्यावर हात ठेवीत श्रीकृष्ण म्हणाला, " त्याचं असं झालं, कीं आमच्या ताईसाहेबांच्या मनांत दुर्योधनाशीं विवाह करण्याचें दिसेना आणि दादासाहेब तर आपला हट्ट सोडीनात असें मला दिसलें. तेव्हां मीच एक युक्ती शोधून काढली. ऐन मुहूर्ताच्या वेळीं माझ्या एका हस्तका करवीं हिला अरण्यांत पळविली. आणि मुहूर्त चुकल्यावर तिला परत आणण्याची व्यवस्था केली. "

" म्हणजे तो राक्षस तुझा हस्तक होता तर ? "

" अरे राक्षस कसला, भीमपुत्र घटोत्कच होता तो ! " कृष्ण म्हणाला.

" अस्सं ?—मी तर त्याच्या त्या अवतारावरून त्याला बिलकूल ओळखलं नाहीं ! " अर्जुन आश्चर्यानें उद्‌गारला.

" आणि तुला आणखी गोंधळांत टाकण्याकरितां हिच्या कंठांतील रत्न-मालेसह ती थैली मीच त्याला टाकून ठेवायला सांगितली होती " कृष्ण म्हणाला.

" आणि आम्हांला संन्यास घ्यायचा सल्ला देणारें तें पत्र—?" अर्जुनानें घाईघाईनें विचारिलें.

" तेंहि खरं मीच लिहिलें होतें. मात्र तुला बिलकुल शंका येऊं नये म्हणून अक्षर अगदी सहीसही सुभद्रेसारखें काढलें होतें !— पण फसलास कीं नाहीं ? " यावर अर्जुनानें कृष्णाला अगदीं कोपरापासून हात जोडून उत्तर दिलें. सुभद्रा मात्र भावानें कांहींहि पत्ता लागूं न देतां केलेल्या या अपूर्व मदतीमुळें अगदीं गहिंवरून गेली. ती कृष्णाला गद्‌गद्‌लेल्या आवाजांत म्हणाली, " कृष्णा, तुझे मजवर उपकार किती झाले हें कांहीं माझ्यानें सांगवत नाहीं. " तिला जवळ घेऊन तिचे डोळे पुशीत कृष्ण म्हणाला, " ताई, मी दुसऱ्याकरितां झटलों असतों तर ही उपकाराची भाषा ठीक होती. परंतु तुझें माझें नातें लक्षांत घेतां मी केवळ माझ्या कर्तव्यापलिकडे काय केलें ? "

" पण कृष्णा, दादांची समजूत रे कशी घालायची ? मला त्यांची फार काळजी "—परंतु तिच्या उत्तराला कृष्णाऐवजीं दुसऱ्याच व्यक्तीकडून उत्तर आलें.

" थांब मी तुम्हां सर्वांनाच आतां काळजीमुक्त करतों—" आवाजाच्या रोखानें त्यांनीं पाहिलें तो हातांत आपली प्रचंड गदा उंचावीत रागानें बेफाम झालेला बलराम त्यांच्यावर धांवून येत असलेला त्यांना दिसला. त्याच्या पाठी-मागून त्याला आवरण्याकरितां सेनापति सात्यकी, गर्गमुनि व इतर अधिकारी मंडळी धांवत येत होती. क्षणार्धांत तो अर्जुनाजवळ येऊन पोंहोंचला व म्हणाला, " अरे चांडाळा अधमा पार्था, अशा कपटानें सुभद्रा मिळवूं पहातोस काय ? तर सुभद्रेबद्दल घे या गदेचा प्रहार— " असे म्हणत बलरामानें अर्जुनाच्या डोक्यांत घालण्याकरितां गदा वर उचलली; आणि ती गदा आतां, या सर्व प्रकारामुळें भांबा-वून व गांधळून गेलेल्या पार्थाच्या मस्तकावर पडणार तोंच निमिषार्धात गर्गमुनींनीं पुढें येऊन बलरामाचा हात मागच्या मागें धरिला व ते म्हणाले, " हां हां ! बलरामा, शुद्धीवर ये, शुद्धीवर ये. अरे अर्जुनाचा घात करून स्वतःच्याच भगि-नीला वैधव्य आणणार कीं काय ? "

बलराम : ( गदा फेंकून देऊन ) तर महाराज, ती गदा घेऊन माझ्या डोक्यांत घालावी ! —

कृष्ण : पण दादा, इतकें यांत संतापण्यासारखें काय आहे !

बलराम : कृष्णा, तूं एक शब्द बोलूं नकोस ! हें सर्व कपट तुझें आहे हें माझ्या लक्षांत आतां आलेलें आहे तूं माझ्या ज्या त्या बेतांत विघ्न करतोस. जाऊं दे, मलाहि कंटाळा आला आहे. आतां या सर्वांचा. नको तें राज्य आणि नको तो प्रपंच. मी संन्यास घेऊन कोठें तरी निघून जातों ! कोण आहे रे तिकडे, माझ्या संन्यासाची तयारी करा—

आतां हा अधिकाधिकच भडकत जाणार असें पाहून गर्गमुनि पुढें झाले. त्याच्या पाठीवरून हात फिरवीत ते म्हणाले, " रामा, तूं महाज्ञाता असून त्रागा कां बरें करतोस ? तुझा मजवर विश्वास आहे कीं नाहीं ? मी तुझें अकल्याण होऊन देईन का ? "

"" नाहीं गुरुमहाराज " बलराम अदबीनें म्हणाला. तो जेवढा संतापी होता तेवढाच दयाळुहि होता. गर्गमुनींना तो पित्यासमान मानी. आपण संतापाच्या भरांत आपल्या कुलगुरूचा उपमर्द करीत आहोंत ह्या जाणीवेनें तो किंचित् ओशाळाच झाला. तो त्यांच्यापुढें मस्तक नमवीत म्हणाला, " महाराज आपणच आतां यांतून मार्ग सुचवा—"

गर्गमुनि : ऐक तर. माझ्या दृष्टीनें सुभद्रेला अर्जुनच पति योग्य आहे. यदु-पांडवांचा जो पूर्वापार संबंध चालत आलेला आहे तो तसाच पुढें चालावा असाच परमेश्वरी संकेत दिसतो.

बलराम : महाराज, मी आपल्या इच्छेविरुद्ध वागणार नाहीं.

गर्गमुनि : तर मग सुभद्रेचा हस्त अर्जुनाच्या हातांत मज्देखत घाल, आणि अर्जुनावरील राग सोडून त्याजवर लोभ कर.

बलराम : ठीक आहे. गुरूंची आज्ञा प्रमाण.

गर्गमुनि : पार्था, तूं बलरामाला नमस्कार कर.

अर्जुन : आर्या, मी आपणास अभिवादन करितों. ( नमस्कार करतो. )

बलराम : ( सुभद्रेचा हात धरून अर्जुनास ) वत्सा, हा भगिनीचा कर मी तव करिं धनंजया घे दिधला ॥

अर्जुन : अत्यादरपूर्वक मीं याचा स्वीकार पहा केला ॥

कृष्ण : ( साकीचा शेवट करितो. )

नांदा सौख्यभरें ॥ शोभो कुल तव सत्कुमरें ॥

गर्गमुनि : तथास्तु.



## प्रकरण....३ रें

★ ★

इ. स. १८१८ मध्यें पेशवाई नष्ट झाल्यानंतरहि जवळ जवळ अर्धे शतक इंग्रजांचें राज्य महाराष्ट्रांत पूर्णपणें स्थिर होऊं शकलें नाहीं. देशाच्या स्वातंत्र्याप्रीत्यर्थ श्रीमंत नानासाहेब पेशवे, राणी लक्ष्मीबाई झांशीवाली व तात्या टोपे या महाराष्ट्रीय पुढाऱ्यांच्या नेतृत्वाखालीं १८५७ सालीं केलेल्या प्रचंड स्वातंत्र्यसंग्रामांत अपयश आल्यानंतर मात्र जवळ जवळ एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीपर्यंत—म्हणजे लोकमान्य टिळकांचें नेतृत्व लाभेपर्यंत, महाराष्ट्र राजकीय चळवळीच्या दृष्टीनें 'एक थंड गोळाच' होऊन राहिला. या कालखंडांतील शिक्षणाच्या वाढत्या प्रसारामुळें, इंग्रजी भाषेच्या द्वारां पाश्चिमात्य सुधारणांचें स्वरूप कळूं लागल्यामुळें, परधर्म व स्वधर्म यांतील गुणदोषांचा तुलनात्मक अभ्यास होऊं लागल्यामुळें तत्कालीन सुशिक्षितांचें लक्ष सामाजिक व धार्मिक सुधारणांकडे अधिकाधिक वेधूं लागलें. १८४३ च्या सुमारास लोकहितवादी ( गोपाळ हरि देशमुख ) यांनीं आपल्या 'प्रभाकर' पत्राद्वारें आठ दहा लेख लिहून पुनर्विवाहाची तरफदारी केली. विष्णुशास्त्री पंडित यांनीं मुंबई येथें १८६५ सालीं 'पुनर्विवाहोत्तेजक मंडळी' स्थापन केली. १८८३–८४ च्या सुमारास पुणें येथें 'फीमेल हायस्कूल'ची स्थापना डॉ. भांडारकर, न्यायमूर्ति रानडे व रा. ब. शं. पां. पंडित यांच्या प्रोत्साहनामुळें झाली. ज्योतिराव फुले यांनीं 'सत्यशोधक समाजा'ची स्थापना करून अस्पृश्योद्धाराची मोहिम जोमानें सुरू केली. मलबारीशेटपुरस्कृत 'संमति वयाचें बिल' १९ मार्च १८९१ रोजीं कलकत्ता येथील वरिष्ठ कायदे कौन्सिलांत पास झालें. प्रिन्सिपॉल गोपाळ गणेश आगरकर यांनीं आपल्या 'सुधारक' पत्राद्वारें अत्यंत निर्भीडपणें परंतु तर्कशुद्ध पद्धतीनें हिंदु समाजांत केवळ रूढीमुळें आलेले दोष व त्यांत बदलत्या कालक्रमानुसार अवश्य असलेल्या सुधारणा यांविषयीं लेख लिहिण्याचा तडाखा सुरू केला. अशा या सुधारणावादी वातावरणांत मराठी सामाजिक नाटकांचा उगम झालेला आहे.

मराठी सामाजिक नाटकांचें मूळ तसें बरेंच जुनें आहे. जुन्या कालखंडांत

होत असलेल्या ललित-तमाशांतून तत्कालीन सामाजिक परिस्थितीचें प्रतिबिंब तर उमटलेलें दिसतेंच परंतु त्यांत आणिल्या जाणाऱ्या पाटील, सावकार, भटजी, शिपाई, सरदार वगैरेंच्या सोंगाद्वारें अधून मधून थोडी फार सामाजिक टीकाहि केलेली आढळते. विष्णुदास भावे करीत असलेल्या कळसूत्री बाहुल्यांच्या खेळांत 'ढोंगी महंत' नांवाचें बुवाबाजीवर प्रकाश पाडणारें एक सामाजिक कथानकहि आहे. परंतु सामाजिक विचारांना प्रथम जोरानें कोणी चालना दिली असेल तर ती इंग्रजी फार्सावरून मराठींत आलेल्या प्रहसनांनीं. ह्या फार्स'चा ऊर्फ प्रहसनांचा प्रवेश मराठी रंगभूमीवर कसा झाला याची हकीगत प्रस्तुत पुस्तकाचे शेवटीं जोडलेल्या परिशिष्टांत दिली आहे ती पाहण्यासारखी आहे. इंग्रजी नाटकांतल्या 'इंटरल्यूड'-प्रमाणें हे फार्स किंवा हीं प्रहसनें मुख्य पौराणिक किंवा ऐतिहासिक नाटक झाल्यावर होत असत. १८७० ते १८९० पर्यंतच्या कालखंडांत ते बऱ्याच मोठ्या प्रमाणावर होत असत. या फार्सांतून तत्कालीन सामाजिक प्रश्नांवर आधारलेलीं कथानकें असत. उदा. 'ढेरपोट्याचा फजिता' (सुशिक्षित स्त्रियांची बाजू), 'मोर एल्एल्. बी.' (उच्च इंग्रजी शिक्षण), 'हुंडा प्रहसन' (हुंड्याचे दुष्परिणाम), 'वसंतोत्सव' (बालावृद्ध विवाहाची अनिष्टता), 'ढोंगी बैरागी' (बुवाबाजी), 'फाकडा मुत्सद्दी' (सुधारकांचें स्वरूप).

मराठींतील पहिलीं सामाजिक नाटकें म्हणजे या फार्सांची 'सुधारून वाढविलेली आवृत्ति' होय. सामाजिक प्रश्न छोट्याछोट्या फार्सांतून केवळ उपहास-विडंबनादि मार्गांनीं मांडण्याऐवजीं ते स्वतंत्र नाटकद्वारें, अवश्य त्या गंभीरपणें व लोकांना पटतील अशा रीतीनें मांडण्याची कल्पना या फार्सांतूनच निर्माण झालेली आहे. गो. ना. माडगांवकरकृत 'व्यवहारोपयोगी नाटक' (१८५९) हें अशा प्रकारचें पहिलें सामाजिक नाटक होय. त्यानंतरचीं एकोणीसशें अखेरची उल्लेखनीय सामाजिक नाटकें म्हणजे 'तरुणी शिक्षण नाटिका' (ना. बा. कानिटकर १८८६), 'वैदिकी हिंसाधर्मतत्त्व प्रहसन' (कार्लेकर १८८३), 'संगीत सौभाग्यरमा' (अ. मा. जोशी १८९०), 'संमतिविवाह' (कृ. वि. मोडक

१८८६), 'वीरतनय' (श्री. कृ. कोल्हटकर १८९६) व 'शारदा' (गो. ब. देवल १८९९) हीं होत.

श्री. गोविंद बल्लाळ देवल यांनीं पुढील नाटकें लिहिलीं.

**भाषांतरित वा रूपांतरितः** 'दुर्गा' (१८८६—इंग्रजींतील 'इझाबला' नाटकावरून), 'झुंझारराव' (१८९० शेक्सपिअरकृत 'ऑथेलो 'वरून), 'फाल्गुनराव' ऊर्फ 'संशयकल्लोळ' (मर्फीकृत 'ऑल इन् दि रॅंग' व



जन्म १८५४

मृत्यु १९१६

श्री. गोविंद बल्लाळ देवल

मोलियरकृत ' गानारेल ' या दोन नाटकांवरून ), ' मृच्छकटिक ' १८८६ ), व ' विक्रमोर्वशीय ' ( १८८९ संस्कृत नाटकांवरून ), ' शापसंभ्रम ' ( १८९३—बाणाच्या ' कादंबरी 'वरून ). **स्वतंत्र नाटकें:** शारदा (१८९९) जरठतरुणी-विवाहाच्या प्रश्नावर ' शारदा ' नाटकाचें कथानक आधारलेलें आहे. याच प्रश्नावर ' जरठोद्वाह ' (पु. भा. डोंगरे १८९०), ' संगीत बसंतोत्सव ' ( बा. ना. डोंगरे १८८७ ), 'कन्याविक्रय दुष्परिणाम' (मो. बि. शिंगणे १८९५), 'रूढिविनाशन' ( द. ज. मराठे १९०० ), ' संगीत इंदुमति ' ( बा. ना. भावे १९०२ ) हीं नाटकें लिहिलीं गेलेलीं आहेत. परंतु नाटकांतील भाषा, संविधानक, रचना, रेखीव व्यक्तिदर्शन, करुण रसाचा परिपोष या गुणांच्या बाबतींत देवलांच्या 'शारदे'नें जें उच्च स्थान मिळविलें आहे त्याचीं काडीचीहि सर यांपैकीं एकाहि नाटकाला येणें अशक्य आहे.

'शारदा' नाटकाचा पहिला प्रयोग ता. १३ जानेवारी १८९९ रोजीं रात्रौ इंदूर येथें किर्लोस्कर नाटक मंडळीनें करून दाखविला.

## शारदा : : नाटककार

### गोविंद बल्लाळ देवल

" अहो भुजंगनाथ आजोबा ! संन्यास घ्या संन्यास !"

" अरे जा ! मला संन्यास द्यायला ब्रह्मदेव आला पाहिजे ब्रह्मदेव ! ! "

—विजारी सांवरीत, सदऱ्याच्या बाह्यांनीं नाकें पुशीत, अनवाणी व उघडींबोडकीं असलेलीं अशीं पंधरावीस वांड पोरें वृद्ध भुजंगनाथाच्या मागें लागलीं होतीं. त्याच्या हातीं लागणार नाहीं इतक्या बेताचें अंतर ठेवून तीं त्याचा पाठलाग करीत होतीं. त्यांना पकडण्याकरितां तो मागें वळला कीं तीं सर्व आस-पासच्या गल्लीबोळांतून केव्हांच पसार होत. आणि मग आसपासच्या जमलेल्या लोकांना हातवारे करीत, संतापानें थरथर कांपत असणाऱ्या भुजंगनाथाचें पुढील

वाक्य तेवढें ऐकूं येई. "कोण, कोण मला म्हातारा म्हणतो तो ? आणि मला संन्यास कोण देणार तो येऊं दे असा पुढें !"

संगमपुरांतील तें एक नेहमीचें दृश्य होतें. पण गेले आठ दिवस पोरें जरा जास्तच चेकाळल्यासारखें करीत होतीं. आणि त्याला कारणहि तसेंच होतें. सुदाम सावकार या नांवानें प्रसिद्ध असलेल्या एका जख्खड म्हाताऱ्यानें केवळ श्रीमंतीच्या जोरावर नुकतेंच एका सात वर्षाच्या परकऱ्या मुलीशीं लग्न लाविलें होतें. गांवांत अगदीं पोरीसोरींपर्यंत तो अलिकडे एक चर्चेचाच विषय झाला होता-लग्न अगदीं गुपचूप झाल्यामुळें त्या गांवांतील सुशिक्षित मंडळींना आतां केवळ हात चोळीतच बसावें लागलें होतें ! अशा मनःस्थितींत गांव असतांना लोकांच्या कानावर अशी कुणकुण आली कीं भुजंगनाथ नांवाचा गांवांतील एक वृद्ध गृहस्थहि सुदाम सावकाराच्याच पावलावर पाऊल टाकण्याच्या बेतांत आहे. बातमी पट्कणीं व्हावयाला त्या छोट्याशा गांवांत वेळ लागला नाहीं. रस्त्यांत भुजंगनाथ दिसला कीं पुरुष मंडळी एकमेकांच्या हातांवर टाळ्या देऊन आपापसांत खसखस पिकवीत, बायका तोंडाला पदर लावून या वृद्ध नवरदेवाच्या ध्यानाकडे पहात व नाक खांदे ठसक्यानें उडवीत शेजारणीच्या कानांत कांहीं तरी कुजबुजत आणि पोरें सोरें तर, " अहो म्हातारबुवा !– अहो नवरदेव !– आतां संन्यास घ्या, दंड घ्या, भगवीं वस्त्रें घ्या" असें ओरडत त्याच्या मागें लागत. आणि मग अशा वेळीं कोणीतरी मानभावीपणानें मध्यें पडे व त्या पोरांना खोट्या दटावणीनें म्हणे, " काय फाजीलपणा चालवलाय रे ? कोण म्हणतो भुजंगनाथ आजोबा म्हातारे आहेत म्हणून ?"–आणि मग भोंवतालीं जमलेलीं वात्रट पोरें त्या मध्यस्थाचें तेंच वाक्य तालासुलावर म्हणत त्याच्याभोंवतीं अधिकच हुल्लड माजवीत.

आज भद्रेश्वर दीक्षितांनीं भुजंगनाथाची पोरांच्या हातून सुटका केली. पोरें लांब पळाल्यावर भद्रेश्वरांनीं मोठ्या मानभावीपणानें विचारिलें, " भुजंगनाथ काय आहे काय प्रकरण हें ? " आणि मग डोक्याला करवतीकांठीं उपरण्याचें टोंक लावीत भुजंगनाथानें आपल्या दुःखाचा पाढा त्यांच्यापुढें वाचिला. "माझा

पुतण्या भैरवनाथ, त्यानं ही माकडसेना चिथावून माझ्या अंगावर सोडली आहे. त्याच्या मनांत अशानं मला वेड लागेल, म्हणजे सरकार मला कोंडून ठेवतील आणि मी निपुत्रिक म्हणून माझ्या संपत्तीचा वारस याला करतील; पण म्हणावं, माझ्या संपत्तीपैकीं एक कपर्दिकासुद्धां तुझ्या हातीं लागायची नाहीं. आणि एवढ्यासाठींच तर मी लग्न करणार ! आणि तसं काय माझं अगदीं लग्नाचं वय गेलं आहे असं नाहीं ! दीक्षित, तुम्हाला यज्ञोपवीताची शपथ आहे, तुम्हीच सांगा मी तसा म्हातारा दिसतों का ? ”

पण भुजंगनाथाचा पुतण्यावरील हा आरोप त्याच्या तारुण्याइतपतच खरा होता ! तो लग्नाकरितां उल्लू झाला होता हेंच खरें होतें. भद्रेश्वर दीक्षिताची वृत्तिहि सामाजिक नीतीची चाड ठेवण्याइतपत शुद्ध राहिलेली नव्हती. सुदाम सावकाराचें लग्न जमवून देऊन त्यानें त्या अभद्र व्यवहारांत आपला खिसा चांगलाच गरम करून घेतला होता. आतां हें नवीन कूळ त्याच्याकडे आपण होऊन चालत आलेलें असतांना तो तें कसें सोडील ? त्यानें भुजंगनाथाला स्वतःला वाटत होतें त्यापेक्षां आणखी दुसपट तरुण असल्याचें पटवून दिलें. आणि त्यानंतर त्यांचें बराच वेळ बोलणें झालें. एखाद्या दूरच्या ठिकाणीं जाऊन विवाह जमविण्याचें वचन शेवटीं भद्रेश्वर दीक्षितांनीं त्या म्हाताऱ्याला दिलें. व त्याबद्दल त्यांना भरपूर मोबदला देण्याचें भुजंगनाथानें मान्य केलें. गवगवा होऊं नये म्हणून हा सर्व व्यवहार अत्यंत गुपचूपपणें करण्याचें ठरलें.

एका सार्वजनिक देवळाच्या आसमंतात त्या दोघांच्या या अगदीं ‘खाजगीत’ म्हणून झालेल्या गोष्टी गुप्त कशा रहाव्यात ? केवळ लोकसेवेलाच वाहून घेतलेल्या कोदंड व हिरण्यगर्भ नांवाच्या दोन ब्रह्मचारी तरुणांनीं तो सर्व संवाद ऐकिला; व त्यांनीं ताबडतोब या दोघांच्या पाळतीवर राहून हा विवाह मोडून टाकण्याचा निश्चय केला. पुराणिकाचा वेष घेऊन कोदंडानें त्या दोघांबरोबर जाण्याचें ठरविलें. नंतर ते दोघे बोलत जवळच्या शिवालयांत गेले. तेथें कांहीं तरुण मुली देवदर्शनाला आल्या होत्या. त्यांच्या बोलण्यावरून त्या कांहीं तरी काळजींत असाव्यात असा संशय त्या दोघांना आला. त्यांनीं पुढें होऊन त्यांची

चवकशी केली. त्या मुली गंगापूरच्या होत्या. त्यांच्यापैकींच एका शारदा नांवा-च्या १३–१४ वर्षांच्या मुलीच्या वडिलांच्या मनांत तिला एका वृद्ध वराला देण्याचें होतें. त्यामुळें त्या चिंतेंत होत्या. त्या चिंतेंतून मुक्त होण्यास कांहीं उपाय सुचवावा अशी त्यांनीं कोदंडाला विनंती केली. "अनुरूपवरप्राप्तिरस्तु। शारदे, तूं अगदीं भिऊं नकोस," असें आश्वासन देऊन कोदंड तेथून निघून गेला.

\+ + +

'दिव्याखालीं अंधार' हा न्याय आपल्या बहुतेक पवित्र क्षेत्रस्थानांना अगदीं तंतोतंत लागू पडण्यासारखा आहे. ऐहिक जीवितांतील सुखदुःखांचा विसर पडून, त्रस्त, उद्विग्न मनुष्याला, सर्वांबद्दल समदृष्टि असणाऱ्या जगन्नि-यंत्याच्या सान्निध्यांत, कांहीं काळ तरी रहावयास मिळावें या उदात्त कल्पनेनें प्रेरित होऊन आपल्या पूर्वजांनीं निसर्गरम्य अशा ठिकाणीं पवित्र मंदिरें स्थापन केलीं. परंतु या मंगल कल्पनेला लाथाडून सध्यां क्षेत्रस्थांनीं तें क्षेत्र अधिकाधिक अमंगल, अभद्र कसें होईल या दृष्टीनें जणुं कांहीं प्रयत्नांची अहमहमिका सुरू केली आहे. असेंच एक गंगापूर नांवाचें क्षेत्र भद्रेश्वर दीक्षितांनीं आपलें 'कर्तृत्व-क्षेत्र' म्हणून निवडिलें!

गंगापूरच्या सरकारी हेरंब महालांत त्यानें तळ ठोकला. भुजंगनाथांत त्यानें आमूलाग्र क्रांती करून टाकली. तो तरुण दिसावा म्हणून त्यानें त्याला कृत्रिम दांत बसवावयास लाविलें; केस कलपानें काळे केले; बहिरेपणा लक्षांत येऊं नये म्हणून त्याला अबोल केलें; त्याच्या तोंडावरच्या सुरकुत्या लक्षांत येऊं नयेत म्हणून गांठीभेटीचें ठिकाण कमी उजेडाच्या अंतर्महालांत योजिलें; वजन वाढावें म्हणून आटीव दूध, कोहाळेपाक, बदामाची खीर वगैरेंचा खुराक सुरू केला; वय फक्त ३०-३२ च्या आसपासचें आहे असा बोभाटा केला; तो श्रीमंत भासावा म्हणून त्याचें नांवच बदलिलें; प्रसिद्ध मंडलेश्वरकरांचे हे सापत्नबंधु जयधुंडिराज असल्याचें तो क्षेत्रस्थांना सांगे. आणि या नांवाला व खोट्या वयाला साजेसें वागणें त्याला भाग पाडलें. साऱ्या जन्मांत स्वसंतोषानें ज्यानें कुणाला एक बोटभर चिंधी, किंवा तांब्याचा तुकडा, किंवा घांसभर अन्न सुद्धां दिलें नव्हतें त्या भुजंग-

नाथाली भद्रेश्वर दीक्षितानें अवघ्या पंधरा दिवसांतच ब्राह्मणभोजन, नैवेद्य, पूजा, अनुष्ठान, बक्षिशी, बिदागी यांपायीं अक्षरशः पाण्यासारखा पैसा खर्च करा-वयास लाविलें !

या गंगापुरांत कांचनभट नांवाचा एक लोभी ब्राह्मण रहात असे. त्याला एक मुलगा व एक मुलगी होती. मुलाचें नांव जयंता; मुलीचें नांव शारदा. शारदा चांगली १३-१४ वर्षांची होती; त्या काळच्या मानानें पहातां तिचें लग्न दोन तीन वर्षांपूर्वींच व्हावयास हवें होतें. मुलगी चांगली देखणी, उफाड्याची. त्या लहान गांवांत गांवकुचाळकीला येवढें भांडवल पुरेसें होतें. ती रस्त्यां-तून जाऊं लागली कीं टारगट पोरेसोरें, घाटावर धुण्यापाण्याला गेली कीं मोठ्या बायका आणि हळदीकुंकू किंवा देवदर्शन अशा निमित्तानें एकत्र जमणाऱ्या तिच्या बरोबरीच्या मुली तिच्या लग्नाच्या लाडवांची उठाठेव करीत असता शारदा फार खिन्न होई अशा वेळीं. तिची आई इंदिरा हिला तर फारच ओशाळल्या-सारखें होई. परंतु चिक्कू कांचनभट मुलीच्या लग्नाप्रीत्यर्थ एक कवडीहि खर्च कर-ण्यास तयार तर नव्हताच, पण उलट मुलगी एखाद्या श्रीमंत बिजवराच्या गळ्यांत बांधून आपलें कांचनभट हें नांव सार्थ करण्याच्या विचारांत मात्र होता. धूर्त व कावेबाज भद्रेश्वरानें हें कूळ बरोबर हेरलें. त्यानें तात्काळ त्यावर कांचनप्रयोग सुरू केला. 'श्रीमंतां'चें वय, पत्रिका, गोत्र हें सर्व त्यांचा शारदेशीं विवाह होण्याच्या दृष्टीनें कसें सर्वस्वीं अनुकूल आहे हें त्याला पुराव्यानिशीं ( खोट्या ! ) पटवून दिलें. लग्नाआधीं व नंतर मिळून एकूण रोख रुपये पांच हजार व वर्षाची पांचशें रुपयांची नेमणूक श्वशूर म्हणून त्याला देऊं केली. इतका 'मुखलेप' केल्यावर कांचन-भटानें होकाराचा 'बोल' कां न काढावा ?—त्यानें आपल्या पत्नीला व मुलीला नाना तऱ्हेच्या 'सुरस व चमत्कारिक' थापा मारून लग्नाला तयार केलें. भोळ्या इंदिरा-बाईंना तें सारें खरेंच वाटलें !

पुराणिक म्हणून श्रीमंतांजवळ असलेल्या कोदंडाचें दीक्षितांच्या व भुजंग-नाथाच्या सर्व हालचालींवर बारीक लक्ष होतेंच. विवाहाची योजना निश्चित ठर-ण्याच्या बेतांत आलेली पाहून तो अगदीं बेचैन झाला. तो सरळ श्रीमंतांकडे

गेला व त्यानें त्यांना हा भावी विवाह मोडण्याचा सल्ला दिला. श्रीमंतांना त्याचें धाडस पाहून हादराच बसला. त्या दोघांचें बोलणें चालू असतांनाच तेथें भद्रेश्वर दीक्षित व सुवर्णशास्त्री—एक नामधारी शास्त्री !—आले. त्या तिघांनीं मिळून कोदंडाची दर उडविण्यास सुरुवात केली. कांहीं वेळ कोदंड त्यांना शांतपणें उत्तरें देत होता परंतु हे तिघेहि त्या त्याच्या वृत्तीचा गैरफायदा घेत आहेत, खोटे शास्त्राधार देत आहेत, असें दिसूं लागल्यावर त्यानें सरळ त्यांच्या वर्मावरच घाव घातला.

कोदंड : एक डोळा यमपुरीकडे आणि दुसरा स्मशानाकडे ठेवलेल्या थेरड्यानें तरुण कुमारीशीं विवाह लावावा, अशी शास्त्राची स्पष्ट संमति आहे का?
सुवर्णशास्त्री : नसेल, पण निषेध तर नाहींना ? यद्यपि असला तथापि शास्त्राद्रूढिर्बलीयसी

कोदंड : म्हणजे स्त्रियांना तेवढे शास्त्राचे कडक निर्बंध आणि पुरुषांना मात्र पुरुषांनींच स्थापन केलेल्या शिथिल रूढी, हा कोणता न्याय ?
दीक्षित—हा पुरुषसत्तान्याय, असंच कां म्हणाना ! होय कीं नाहीं शास्त्रीबुवा ?

त्यांच्या निर्लज्जपणानें इतकी सीमा गांठल्यावर कोदंडानें त्यांच्या सर्व कारस्थानाचा क्षेत्रभर डंका करावयाचा धाक घातला. परंतु भद्रेश्वर दीक्षितहि कांहीं लेचापेचा नव्हता. कोदंडाला बाहेर सोडण्यांतील धोक्याची त्याला चांगलीच जाणीव होती. त्यानें चटकन् एक खुणेची टाळी वाजविली. क्षणार्धांत दोन धटिंगण बाजूच्या खोलींतून तेथें आले. कोदंडाच्या मुसक्या बांधण्यांत आल्या. 'हरब महालाच्या तळघरांत त्याला लोटण्यांत आलें. हळु हळु त्याचें कण्हणें अस्पष्ट होत गेलें.

शारदेच्या या ठरलेल्या लग्नाची बातमी लवकरच साऱ्या गंगापूरभर झाली. हुंडा किती घेणार, मानपानाचें काय, मुलीच्या अंगावर दागिने कोणते घालणार, जेवणावळ कितपत जंगी होणार...वगैरे वगैरे 'लग्नघाई'तील प्रश्नांची चर्चा देखील सुरू झाली. पण या सर्व भानगडींत शारदेला आपला पति—कीं ज्याच्याशीं

तिला उभा जन्म काढावयाचा होता. तो—बिलकुल पहावयास मिळाला नव्हता. कारण रीतच नव्हती तशी त्या काळीं !—पण यामुळें होई काय कीं पुष्कळदां तिच्या या ठरलेल्या विवाहाबद्दल बोलतांना लोक असे छद्मीपणानें कां हंसतात हें तिला बिलकुल कळूं शकत नसे. तिला कांहीं वेळां वाटे कीं कदाचित् आपण अत्यंत गरीब व आपला भावी पति अत्यंत श्रीमंत ही गोष्ट या लोकांच्या कुत्सित नजरेंत खुपत असावी. परंतु शारदेला या बाबतींत फार काळ अंधारांत रहावें लागलें नाहीं. एका छोट्याशा घटनेमुळें लोकांच्या हांस्याचा विषय आपण कां होत आहोंत याचें रहस्य तिला उलगडलें. तिची मैत्रिण मंदाकिनी कुबेर हिच्या येथें मुलींच्या हळदीकुंकुवाचा समारंभ होता. त्या निमित्तानें वल्लरी, तुंगा, त्रिवेणी, जान्हवी, शरयू वगैरे शारदेच्या सर्व मैत्रिणी जमल्या होत्या. या मुलींमधली वल्लरी ही एक मोठी थट्टेखोर चिमखडी पोर होती. बोलण्याचालण्यांत तिचा असा ठसका असे कीं कांहीं विचारूं नका! तिखट कान, चवकस जीभ आणि पायाला भिंगरी—यामुळें तिच्याजवळ साऱ्या गंगापूरच्या बातम्या असत. तिनें सगळ्या मुलींना शारदेच्या लग्नाची बातमी अगदीं साग्रसंगीत सांगितली. आणि सर्व मुलींनीं मिळून शारदेची इतकी बेसुमार थट्टा केली कीं ती बिचारी अगदीं रड-कुंडीला आली.; आणि मुलींनीं शारदेच्या भावी पतीचें वय किती असा प्रश्न जेव्हां विचारला तेव्हां तर वल्लरीनें अगदीं कहर केला. तिनें शारदेच्या पतीचें वर्णन करणारें एक गाणेंच म्हणून दाखविलें. तिनें स्वतःच तें रचिलें होतें. तें गाणें असें—

म्हातारा इतका न ॥ अवघें पाऊणशें वयमान ॥ लग्ना अजुनि लहान ॥ध्रु.॥
दंताजींचें ठाणें उठलें, फुटले दोन्ही कान ॥ डोळे रुसले कांहीं न बघती नंभा म्हणते मान ॥१॥ तुरळक कोठें केंस रुपेरी, डोइस टक्कल छान ॥ भार वयाचा वाहुनि वाहुनि कंबर होय कमान ॥२॥ कांठीवांचुनि नेट न पायां परि मांटें अवसान ॥ उसनी घेउनि ऐट चालतां काय दिसें तें ध्यान॥३॥

आपल्या भावी पतिराजांचें हें वर्णन ऐकून शारदेच्या डोळ्यापुढें अंधारीच आली !

आणि दुर्दैवानें कांहीं दिवसांतच बल्लरीच्या वर्णनांतील सत्यता तिला स्वत:लाच पटली. एक दिवस 'दाखविण्याकरितां' म्हणून तिला घेऊन कांचनभट श्रीमंतांच्या हेरंब महालांत गेले. श्रीमंतांना तिला प्रश्न वगैरे विचारण्यास मोकळेपणा वाटावा व मुलगी किती धीट आहे हेंहि श्रीमंतांच्या लक्षांत यावें असा दुहेरी डाव मनांत योजून कांचनभट व भद्रेश्वर दीक्षित महालाच्या बाहेर गेले आतांपर्यंत परक्या पुरुषाशीं एकान्तात कधींहि भाषण न केलेल्या, जुन्या वळणाच्या शारदेला हें सारें कसेंसेंच वाटलें. तिनें मन घट्ट करून भीतभीत एकदां श्रीमंतांकडे पाहिलें. वृद्धापकाळामुळें थरथरणारें शरीर, कपाळावरील आंठ्यांचें जाळें, सुरकुतलेला चेहरा, कलपाला न जुमानतां बाहेर डोकावणारे पांढरे केंस, अधून मधून आरशांत पहाण्याची अचरट लकब— हा सर्व श्रीमंतांचा थाट पाहून शेतांत उभ्या केलेल्या बुजगावण्याला नाजुक पांखरें जशीं बिचकतात तशी बिचारी शारदा बिचकली. तरीहि श्रीमंतांनीं जेव्हां तिला तिचें नांवगांव वगैरे विचारिलें तेव्हां तिनें त्यांना अत्यंत विनयानें उत्तरें दिलीं. परंतु या तिच्या विनयाच्या वागणुकीचा गैरफायदा घेऊन श्रीमंत अगदीं तिच्या जवळ आले व तिला म्हणाले, " बरं, आतां वर पहा, आणि मी तुला आवडलों असं हास्यमुखानं सुचीव बरं." आणि या पागलपणांत भर घालण्याकरितां कीं काय त्यांनीं तिचा हात धरण्याचाहि प्रयत्न केला. त्याबरोबर शारदा चपापून मागें झाली व म्हणाली, "हें पहा, असा जर चावटपणा पुन्हां कराल, तर मीं मोठ्यानं ओरडून बाबांना हांक मारीन. पाहिलीतना मला ? जातें मी आतां." हे तिचे शब्द ऐकतांच आतांपर्यंत ओढूनताणून आणलेली श्रीमंतांची ऐट ढांसळली. ते तिच्या अक्षरशः हातापायां पडत म्हणाले, "नको नको, तुझ्या पाया पडतों, ओरडूं नकोस. पुन्हां तसं करायचा नाहीं. खोटं वाटत असेल तर ही पहा थोबाडींत मारून घेतों" आणि असें म्हणून त्यानें खरोखरीच स्वतःच्या थोबाडींत फडाफडा मारून् घेतलें. परंतु अशा तऱ्हेनें मारून घेतांच त्यांच्या तोंडांतली दांताची कवळी मात्र पटकन् बाहेर पडली. तें पाहून शारदा चिडून म्हणाली, "माझे आजोबा शोभाल इतकें तुमचें वय, आणि काय हा अचरटपणा तुम्ही मांडलाय ?" श्रीमंतांना येवढें निमित्त पुरलें. तिच्यावरच उलट कुरघोडी करून ते म्हणाले,

"थांब तुझ्या बापाला जाऊन सांगतों, तुमची पोर उद्धटपणानं आम्हांला थेरडा म्हणाली म्हणून!" आणि ते तावातावानें तेथून निघूनहि गेले. बाहेर उभा राहून कांचनभट हें सारें ऐकतच होता. आपल्या पोटच्या गोळ्यावर आलेल्या या प्रसंगामुळें त्या लोभी ब्राह्मणाला वाईट तर वाटलें नाहींच पण उलट आतां हें लग्न फिसकटून आपले पैसे बुडणार या भीतीनें त्यानें तिला उलट गुरासारखें मारिलें मात्र! तेवढ्यानेंहि समाधान न होऊन कीं काय घरीं गेल्यावरहि पुन्हां त्यानें तिला यथेच्छ बडविलें. शेवटीं इंदिराबाईंनीं मध्यें पडून तिला सोडविलें. त्यांनींहि ह्या लग्नाविरुद्ध पतीचं मन वळविण्याची पराकाष्ठा केली. परंतु "तुम्ही बायका म्हणजे शुद्ध अडाणी जनावरं. घातलेलं खावं, दिलेलं नेसावं, आणि सांगितलेलं करावं हें तुमचं काम. जास्त पंचाइतींत पडण्याची जरुर नाहीं. मी तिला तिथेंच देणार." असें त्या मायलेकींना दरडावून कांचनभट तावातावानें सायंसंध्येकरितां नदीवर निघून गेला!

इकडे शारदा रागारागानें निघून गेल्यापासून श्रीमंत व भद्रेश्वर भटजी हे दोघेहि बेसुमार बेचैन झाले. त्या दोघांनीं कांचनभटामागें लग्नाचा लकडा लाविला. ह्या घाईमागें आणखीहि एक महत्त्वाचें कारण होतें. त्यांच्या कारस्थानाची बितंबातमी असलेला व या लग्नाला कसून विरोध करणारा तरुण पुराणिक कोदंड हा तळघरावर पहाऱ्यावर ठेवलेल्या पहारेकऱ्याला वश करून घेऊन तेथून पळून गेला होता. तो बाहेरून या दोघांना धमकीचीं पत्रें पाठवूं लागला होता. गांवांतहि त्यानें बराच बभ्रा करण्यास सुरुवात केली होती. ह्या प्रकरणामुळें भद्रेश्वराची फारच धांदल उडाली. तरीहि त्यांतल्या त्यांत कांहीं बांका प्रसंग आल्यास आपण अगदींच नागवले जाऊं नये म्हणून त्यानें हातचलाखीनें श्रीमंतांच्या येथील जे जडजवाहीर, सोनें-नाणें लांबवलें होतें तें सर्व एका पेटींत घालून श्यामसुंदर नांवाच्या एका विश्वासांतल्या नोकराजवळ दिलें व तें आपल्या कुटुंबाकडे पोंहोंचविण्यास त्यास सांगितलें.

× × × ×

होतां होतां शेवटीं लग्नाचा दिवस उजाडला. हेरंब महालांत प्रचंड गर्दी उसळली. श्रीमंतांना शोभेलसा थाटमाट करण्यांत आला होता. लग्नमंडपांत उंची

गालीच्यांवर शास्त्री, वैदिक, भिक्षुक, क्षेत्रस्थ श्रीमान् गृहस्थ वगैरे बसले होते. एकीकडे लफ्फेदार लुगडीं व भारी दागदागिने घालून आलेल्या स्त्रिया उभ्या होत्या. मागच्या बाजूस शिपाई, प्यादे वगैरे उभे होते. बाहेर मंगल वाद्यें वाजत होतीं. बोहल्यावर वधूवर उभे होते. मध्यें अंतरपाट धरण्यांत आला होता. भिक्षुक मंडळी आळीपाळीनें मंगलाष्टकें म्हणत होतीं. मंडळी दर कडव्याच्या शेवटीं ' शुभमंगल सावधान ' म्हणून अक्षता टाकीत होती. आतां लग्नघटिकेला अर्धेच मिनिट उरलें होतें. अर्ध्या मिनिटानें अंतरपाट बाजूला होऊन भुजंगनाथाच्या हाराचा विळखा कोंवळ्या शारदेच्या गळ्याभोंवतीं पडणार होता. लोभी कांचनभट, पाताळयंत्री भद्रेश्वर एकमेकांकडे समाधानाच्या नजरेनें पहात होते. कारण अर्ध्या मिनिटानें ते दोघे एक कोंवळी, निष्पाप, अजाण मुलगी देवाब्राह्मणांसमक्ष त्या वृद्ध भुजंगापुढें बळी म्हणून देणार होते ! मंगलाष्टकांचें तिसरें कडवें जेमतेम संपलें असेल नसेल तोंच बाहेर कांहींतरी बराच मोठा गलबला चालू असल्याचा आवाज ऐकूं आला. सगळी मंडळी त्या दिशेनें पाहूं लागली. तेवढ्यांत गर्दीतून वाट काढीत एक तरुण ब्रह्मचारी बोहल्यापाशीं येऊन पोहोंचला. त्याला पहातांच दीक्षित दचकलेच; आणि श्रीमंतांची तर बोबडीच वळली ! कारण तो तरुण दुसरा तिसरा कोणी नसून कोदंडच होता. त्यानें येतांक्षणींच सर्वांना खड्या आवाजांत विचारिलें, " अहो वैदिक गृहस्थहो आणि याज्ञिक उपाध्याय हो, हा सगोत्र विवाह तुम्हां सर्वांनी मान्य आहे काय ? श्रीमंतांचं व शारदेचं दोघांचं काश्यप गोत्र आहे याची तुम्हांला जाणीव आहे काय ?" हें ऐकतांच सर्व मंडळी दीक्षितांकडे पाहूं लागली. पण दीक्षित म्हणजे बारा गांवचें पाणी प्यालेला ! त्यानें सर्वांना ओरडून सांगण्यास सुरवात केली की हा ह्या गांवांतील एक भ्रमिष्ट, वेडसर असा गृहस्थ आहे; त्याकडे कोणी लक्ष देऊं नये. परंतु कोदंडहि कांहीं कमी नव्हता. त्यानें आपला मोर्चा श्रीमंतांकडे वळविला. त्यानें आवाज चढवून श्रीमंतांना विचारिलें, " काय हो श्रीमंत, तुमचं गोत्र काय बोला." कोदंडाचा रुद्रावतार पाहून आधींच खचून गेलेले श्रीमंत बोलून गेले " आमचं गोत्र काश्यप ! " आणि मग मात्र त्या मंडपांत एक

लावण्यासाठीं म्हणून जमलेल्या सर्वांनीं या धर्मबाह्य विवाहाविरुद्ध एकच गिल्ला सुरू केला. दीक्षितांनीं त्या तशा गोंधळांतहि कोदंडाला कोतवालाच्या स्वाधीन करण्याची भाषा सुरू केली; परंतु तेवढ्यांत स्वतः कोतवालसाहेबच तेथें आपल्या लव्याजम्यानिशीं हजर झाले. त्यांना पहातांच दीक्षितांनीं पुन्हां कांगावा करण्यास सुरुवात केली. ते म्हणाले, "कोतवालसाहेब, या कोदंडानं श्रीमंतांची कंठी चोरली, म्हणून आम्ही याला धरून कोतवालींत पाठवत असतां हा पळून गेला. आणि साहेब आपण किंचित् बाजूला याल तर..." परंतु कोतवालसाहेब त्याच्या या बोटचेपीच्या आहारीं जाणाऱ्यांपैकीं नव्हते. ते छद्मीपणानें म्हणाले, "खरोखर दीक्षित, काय कुभांड रचलें आहे या नीचांनीं आपल्याविरुद्ध ! आपल्यासारख्या वयोवृद्ध, तपोवृद्ध, पवित्र ब्राह्मणाकडून असा निंद्य प्रकार होईल कसा !" तेवढ्यांत कोदंडाची तळघरांतून सुटका करणारा श्यामसुंदर हा नोकर तेथें एक जडजवाहिराची पेटी घेऊन आला. त्याला पहातांच दीक्षित पांढरेफटक पडले ! ती पेटी कोतवालसाहेबांच्या हातांत देत तो म्हणाला, "कोतवालसाहेब, या दीक्षितांनीं आज सकाळीं माझ्याजवळ ही जडजवाहिराची पेटी देऊन सांगितलें कीं गुप्तपणानें माझ्या गांवीं जाऊन, माझ्या कुटुंबाजवळ ही पेटी देऊन परत ये... यांत कांहीं भानगड असावी असा संशय आल्यावरून मी ही पेटी आपल्यापुढें हजर करीत आहें." कोतवालानें ती पेटी 'खोलण्याची आज्ञा केली. ती पेटी उघडतांच श्रीमंत ओरडले, "अहो हें तर सारें माझें जवाहीर ! हें यानं खास चोरलेलं आहे." आतां मात्र दीक्षितांच्या फटफजितीला पारावार उरला नाहीं. कोतवालानें हाताखालच्या शिपायांना आज्ञा केली, "याचं पागोटं आणि शालजोडी घ्या काढून, आणि चढवा खोडा." नंतर त्यांनीं हेरंब महालाला जप्तीची मोहोर केली व या सर्व गोतावळ्यास कोतवाल चावडीकडे घेऊन जाण्याचा हुकूम फर्मावला. या सर्व प्रकारामुळें 'श्रीमंत' इतके घाबरून गेले कीं शेवटीं अर्धांगवायूचा झटका येऊन ते खालींच कोसळले ! लोभी कांचनभटाला तर यांत फारच बरा असा हिसका बसला. कारण आतां त्याची

हुंड्याची* रक्कम कोण देणार ? दीक्षित चतुर्भुज झालेले आणि श्रीमंत मृत्यू-च्या दारांत ! त्या लोभी ब्राह्मणानें त्या तशा स्थितींतहि आपल्या हुंड्याच्या रकमेची मागणी केली ! "दीक्षित ! हुंड्याची रक्कम टाका आणि मग चला कुठें ते !... अहो कोतवालसाहेब ! तेवढी पेटी तरी माझ्या स्वाधीन करा. अरे गेले !...अहो हुंडा..." याप्रमाणें तो वाटेल तें बरळूं लागला. आणि शेवटीं त्याच्या मेंदूवर या सर्व गोष्टींचा इतका परिणाम झाला कीं त्याला वेड लागून तो रस्त्यांत जो भेटेल त्या प्रत्येकाजवळ हुंडा मागीत फिरूं लागला !

या सर्व प्रकारामुळें बिचाऱ्या शारदेची मात्र अत्यंत केंविलवाणी स्थिती झाली. बाप वेडा झालेला, लग्न मोडलेलें, गांवांत फजिती झालेली, आणि घरांत अठराविश्वे दारिद्र्य ! आणि या सर्वांत भर घालण्याकरितांच म्हणून कीं काय गांवांतल्या शास्त्री मंडळींनीं शारदेचें लग्न झालेलें आहे असा निर्णय जाहीर केला ! अशा स्थितींत बिचाऱ्या इंदिराकाकू तरी किती आणि कशी समजूत घालणार? शेवटीं एके दिवशीं पहांटेच्या सुमारास आईचा डोळा लागला आहे असें पाहून ती हलक्या पावलांनीं घराबाहेर पडली. लवकरच ती स्मशानाजवळ-च्या एका डोहाकांठीं येऊन पोहोंचली. पेटलेल्या चितेच्या उजेडांत एक खडक अंधुक दिसत होता. त्या खडकावर जाऊन ती उभी राहिली. समोर डोहाच्या रूपानें साक्षात् मृत्युच जणूं आ पसरून बसला होता. मृत्यूची व आपली चुकामूक होऊं नये म्हणून तिनें लुगड्याची कांस घालून कंबरेला एक दगड बांधिला. त्या तशा स्थितींतहि—ज्याला वैतागून ती बाहेर पडली होती त्या घराची तिला आठवण झाल्यावांचून राहिली नाहीं. इतका निर्धार करूनहि तिचें मन अजून आईकडे धांवत होतें. आपण नाहींशी झाल्याचें कळतांच ती बिचारी दुःखानें कशी धाय-धाय करील, आणि त्यांत जयंता 'अक्का कुठं आहे ग ?' असें भाबडेपणानें

*वास्तविक पहातां 'कन्याविक्रया'बद्दल मिळणाऱ्या रकमेला 'हुंडा' असें म्हणत नाहींत. ब्राह्मण जातींत अशी रक्कम घेणें निषिद्ध मानिलेलें आहे. ह्या तऱ्हेनें क्वचित् घेतल्या जाणाऱ्या रकमेला विशिष्ट नांव असें नाहीं. मूळ नाटकांत हुंडा हा शब्द वापरलेला असल्यानें व दुसरा सुटसुटीत असा शब्दप्रयोग दृष्टी-पुढें नसल्यानें केवळ 'हुंडा' हा शब्दप्रयोग येथें वापरला आहे.

विचारून तिच्या हृदयाला कसा अधिकच पीळ पाडील......वगैरे एकना दोन हजारों गोष्टी क्षणार्धात तिच्या मनःचक्षूंपुढें येऊन तिचे डोळे भरून आले! परंतु आपल्या मृत्यूनें त्यांचे सर्व हाल, मानहानीचे प्रसंग टळणार आहेत अशा विचारानें तिनें आपलें मन पुन्हां कठोर केलें. तिनें हात जोडिले. परमेश्वराला विनविलें, "देवा! माझ्या आईला, बाबांना, तसंच जयंताला माझा लवकर विसर पडेल असं कर. माझं कल्याण व्हावं म्हणून ते कोदंड किती झटले त्यांना सुखी ठेव. माते गंगे......" असें म्हणून तिनें आपलें शरीर पुढें झोंकलेंहि; परंतु तेवढ्यांत "हां हां हां! शारदे! काय करतेस हें" असें म्हणत तिला कोणी तरी निमिषार्धात मागें खेंचिलें. घाबरलेल्या शारदेनें मागें वळून पाहिलें. त्या व्यक्तीचें तोंड त्या अंधुक प्रकाशांत न्याहाळून पाहतांच ती कमालीची दचकली. तो कोदंड होता. प्रातःस्नान, संध्यार्चन आटोपून घेण्यासाठीं तो गंगेवर चालला असतांना कोणी स्त्री स्मशानांत चालल्याचा भास त्याला झाला. म्हणून तो तिच्या मागोमाग तेथपर्यंत आला. व ती आत्महत्या करण्याच्या बेतांत आहे असें पाहून त्यानें चटकन् तिला मागच्या मागें धरिलें. या अचानक प्रकारामुळें शारदा अगदीं खचून गेली. आपल्या दुर्दैवाला अजून आपल्यावर सूड घ्यावयाचा आहे, असें तिला वाटूं लागलें. आणि त्यांतून ऐनवेळीं कोदंडानेंच तिला वांचविण्याकरितां धांवून यावें या गोष्टीचें तिला कमालीचें आश्चर्य वाटलें. परंतु या एकंदर सर्व प्रकारांत तिची भीड आतां खूप चेपली गेली होती. तिनें किंचित् धिटाईनें कोदंडास विचारिलें, "महाराज आपला स्वप्नावर विश्वास आहे का?"

कोदंड : अगदीं निदिध्यास लागलेल्या गोष्टीविषयींच्या स्वप्नांतलीं कांहीं स्वप्नं क्वचित्कालीं अंशतः खरीं होतात. तुला कोणतं स्वप्न पडलं होतं सांग पाहूं ?

शारदा : अशीच अडीच तीन तास रात्र राहिली असेल आणि माझा डोळा लागून असं स्वप्न पडलं कीं, मी जीव देण्याकरितां नदीवर आलें आणि आतां अशी उडी टाकणार [कोदंड झटकन् तिचा हात धरतो] इतक्यांत आपण येऊन, माझं असंच 'पाणिग्रहण' केलंत.

कोदंड : खरंच शारदे ?

शारदा : माझं स्वप्न जर खरं ठरणार नसेल तर—तर—

कोदंड : शारदे, असा भलताच अविचार करूं नकोस. मी या उगवत्या सूर्य नारायणासमक्ष तुला वचन देतों कीं श्रींनीं अनुमति दिली तर मी तुझें पाणि ग्रहण निश्चितपणें करीन......

श्रींची अनुमति मिळविणें ही एक खरोखर अत्यंत आवश्यक गोष्ट होती. त्यांच्या विवाहांत तीन महत्त्वाच्या अडचणी होत्या. एक म्हणजे शारदा देशस्थ तर कोदंड कोंकणस्थ; दुसरें क्षेत्रस्थ शास्त्री मंडळींनीं असा आग्रह धरिला होता कीं शारदेचें भुजंगनाथाशीं लग्न झालेंच आहे म्हणून; व तिसरें असें कीं देश व धर्म यांच्या सेवेकरितां जन्मभर अविवाहित राहण्याची कोदंडानें प्रतिज्ञा केली होती.

कोदंडाचा मित्र हिरण्यगर्भ यानें श्रींच्या कानावर या सर्व अडचणी घातल्या. कोदंडानें आतापर्यंत केलेली एकंदर समाजसेवा, त्याची ध्येयनिष्ठा व बुद्धिमत्ता यांमुळें श्रींची त्याच्यावर फारच मर्जी होती. त्यांनीं स्वतः जातीनें या प्रकरणांत लक्ष घालून शारदा-कोदंड विवाहांतील सर्व अडचणी दूर केल्या. त्यांनीं आपल्या मठांत क्षेत्रस्थांचे प्रमुख भट्टाचार्य व स्वतःचे शिष्य रामनंदनाचार्य यांमध्यें वरील तिन्ही वादग्रस्त मुद्यांबाबत मोठमोठ्या विद्वानांसमक्ष वाद घडवून आणिला. त्या वादांत रामनंदनाचार्यांचा जय होऊन पुढील तीन निर्णय घेण्यांत आले : देशस्थ—कोंकणस्थ विवाह शास्त्राला असंमत नाहीं; सप्तपदी झाल्यावांचून विवाह पूर्ण होत नाहीं, आणि ज्या अर्थी शारदा-श्रीमंतविवाहांत हा विधि झालेला नव्हता त्या अर्थी त्यांचा विवाह झालेला नाहीं. नंतर स्वतः श्रींनीं आद्यशंकराचार्यांच्या शिष्य-गुरु नानक पित्याची गोष्ट सांगून गृहस्थाश्रमाचें खरें महत्त्व मनांत भरवून व तारुण्यांतील प्रतिज्ञा बहुधा विचारपूर्वक केलेल्या नसतात, असें सप्रमाण सिद्ध करून, कोदंडाचें मन वळविलें.

× × ×

त्यानंतर लवकरच शारदा व कोदंड यांचा विवाह मोठ्या थाटामाटानें साजरा झाला. सप्तपदी होऊन वधुवरांनीं ध्रुवदर्शन घेतल्यावर ते उभयतां जगद्गुरूंना वंदन करण्याकरितां म्हणून गेले. त्यावेळीं जगद्गुरूंनीं आशीर्वाद देऊन कोदंडास उत्तरप्रांताचा धर्माध्यक्ष म्हणून नेमल्याचें जाहीर केलें व नंतर त्यांनीं कोदंडास विचारिलें, " जगदीशानं आणखी तुमचं कोणतं इष्ट करावं ? "

कोदंड : तूर्त हें होवो—

" जरठें न विवाह करावा ॥ कधिंहि न जनकें जरठ वरातें तनुजा देइ विकाया ॥ ध्रु० ॥ ही भवदाज्ञा जो नच पाळी ॥ महापातकी स्वकुळीं जाळी ॥ लोकनियमनास्तव तत्काळीं ॥ भूपें तो दंडावा ॥ १ ॥

जगद्गुरु : तथास्तु, तथास्तु, तथास्तु.



## प्रकरण....४ थें

★ ★

मराठी रंगभूमीवर पौराणिक व सामाजिक नाटकें ज्या काळीं होत होतीं त्याच काळीं, तुरळक प्रमाणांत कां होईना पण कांहीं कल्पक नाटककार आपल्या प्रतिभेच्या बळावर, कोठल्याहि पौराणिक वा ऐतिहासिक घटनेचा आधार न घेतां अगदीं स्वतंत्र, 'कपोलकल्पित' अशा कथानकावर आधारलेलीं नाटकें रचीत होते. अर्थात् प्रारंभींच्या कालांत, नव्यानेंच कल्पनासाम्राज्याच्या वातावरणांत विहार करण्यास घुसलेल्या या मंडळींच्या भराऱ्या अक्षरशः भरमसाटच होत्या. त्यांचे नायक, नायिका विमानांतून प्रवास करीत, पाण्यांत अदृश्य होत, तिसऱ्या मजल्याच्या गच्चीवरून उडी टाकून जमिनीवर शिरसलामत उतरत, अरण्यांतील वाघ, सिंह पशूंना चुटकीसरसे लोळवीत, अंगावर पन्नास सैनिक धांवून आले तरी तलवारीच्या दोन चार फटकाऱ्यांतच त्यांचा धुव्वा उडवीत. भुयारांतून नाहींसें होणें म्हणजे त्यांच्या हातचा अगदीं मळ असे. अशा स्वरूपाच्या 'सुरस व चमत्कारिक' गोष्टींनीं युक्त अशीं हीं नाटकें असल्यामुळेंच बराचसा प्रेक्षकवर्ग त्यांच्यावर खूष होता तर त्या काळचे कांहीं प्रागतिक विचाराचे लोक या प्रकारच्या नाटकांतील अवास्तव गोष्टी अमान्य असूनहि केवळ हीं नाटकें 'कपोलकल्पित' आहेत—प्रतिभेच्या, कल्पकतेच्या स्वातंत्र्यांतून स्फुरलेलीं आहेत म्हणून त्यांचें कौतुक करीत होते; येवढेंच नव्हे तर अशा प्रकारचीं नाटकें लिहिलीं जावीं अशा स्वरूपाचा प्रचार करीत होते. याच्या उलट कांहीं पुराणमताभिमानी मंडळी, पौराणिक नाटकांत या नव्या 'कल्पनारम्य' नाटकांइतकेच किंबहुना कांकणभर अधिकच असे अद्भुत व अवास्तव प्रसंग असतांनाहि केवळ तीं 'स्वरचित' आहेत येवढ्याच मुद्यावर अगदीं अप्रस्तुत अशी टीका करीत होते. सांगलीकर नाटक मंडळीच्या नाटकांवर टीका करितांना १८५६ सालीं 'वर्तमानदीपिका' या वृत्तपत्राच्या संपादकांनीं अशी सूचना केली होती कीं, यापुढें नाटककारांनीं महाभारतरामायणादि ग्रंथांतील त्याच त्या पौराणिक प्रसंगांवर नाटकें रचीत न बसतां आपल्या नाट्यवस्तूकरितां कांहीं नवीन काल्पनिक विषय निवडावेत. यावर प्रतिटीका करितांना

'ज्ञानप्रकाश'चे संपादक त्याच आठवड्यांतल्या अंकांत लिहितात, "जर अशा ग्रंथांच्या (रामायण-महाभारतादि ग्रंथांच्या) आधारें झालेल्या नाटकांपासून लोकांचा फायदा कांहींच होत नाहीं असें दीपिकाकारांचें मत असेल, आणि सोकाजी, रत्नी, मोगऱ्या या पात्रांवर 'दीपिका'कारांनीं आपलें बुद्धिचातुर्य खर्च करून रचलेलीं नाटकें जर मनोरंजक व लोकोपयोगी असें त्यांस, व ज्या लोकांस वाटत असेल त्यांस आमचा मित्र 'प्रभाकर' (भाऊ महाजन संपादित साप्ताहिक—स्थापना—१८४०.) यानें नोंदलेलें सोकाजी, पुतळाजी हेंच विशेषण देतो. हीं 'दीपिका'-वाल्यांसही मोठी शरम आहे कीं, सांगलीकर यांनीं रामायण, महाभारताच्या आधारें रचलेलीं सुरस व मनोरंजक नाटकें तीं निरुपयोगी व 'दीपिकें'तील व 'चंद्रिके'-तील (मासिक—स्थापना—१८५४) पंचपचीत व घाणेरडीं तीं अत्यंत उपयोगी होत."

परंतु या प्रतिकूल टीकेकडे लक्ष न देतां 'कल्पनारम्य' नाटक'— ज्याला इंग्रजींत 'रोमान्सेस्' असें म्हणतात— लिहिण्याचा क्रम कांहीं स्वतंत्र प्रज्ञेच्या नाटककारांनीं चालूच ठेविला होता. असे कांहीं उल्लेखनीय प्रयत्न म्हणजे 'जयपाल' (वि. ज. कीर्तने १८६५), 'मणिग्रीव' (स. नी. तळेकर १८८५) 'छेलबटाऊ मोहनाराणी' (द. वा. जोगळेकर १८८६), 'मंजुघोषा' (शि. वि. गोगटे १८८८), 'रंभा' (पुणेंकर १८९१), 'वीरतनय' व 'मूकनायक' (श्री. कृ. कोल्हटकर—१८९६) 'कांचन-गडची मोहना' (कृ. प्र. खाडिलकर १८९८) 'युवती विजय' (मा. ना. पाटणकर १८९४) व 'श्रीविक्रम-शशिकला' (मा. ना. पाटणकर १८९९) हीं होत. यांपैकीं 'वीरतनय' या नाटकाला 'किर्लोस्कर नाटक मंडळी'नें जाहीर केलेल्या एका स्पर्धेत पहिलें बक्षिस मिळालें. पाटणकरांची नाटक कंपनी तर जवळ जवळ ह्या प्रकारच्या नाटकांवरच चालली होती. त्यांच्या 'श्रीविक्रम-शशिकला' ह्या नाटकाच्या पुस्तकाच्या अवघ्या ५-६ वर्षांत सात आवृत्त्या खपल्या. 'कल्पनारम्य' नाटकाच्या या वाढत्या लोकप्रियतेचें यश कशांत आहे, त्यांत कोणते दोष आहेत व ते कोणत्या मार्गानें काढितां येतील वगैरे

मुद्यांची विधायक स्वरूपाची चर्चा न करितां कांहीं तत्कालीन टीकाकार शेवट-पर्यंत त्यांतील साऱ्या दोषांचें खापर त्यांतील 'मनःकल्पिता'वरच फोडीत राहिले: १९०३ सालीं प्रसिद्ध झालेल्या 'मराठी रंगभूमि' या ग्रंथांत, पाटणकर नाटक-मंडळीबाबत तक्रार करितांना श्री. आ. वि. कुलकर्णी लिहितात, "... आतां-पर्यंत प्राचीन, प्रख्यात व लोकोत्तर ग्रंथांतील कथाभाग घेऊन नाटकें रचीत असल्यामुळें संविधानक ह्यांगलें सांपडून व्यक्ति, स्थलें व कल्पना याहि उदात्त आणि उन्नत अशा असल्यामुळें नाटक भारदस्त होई. पण रा. पाटणकर यांनीं हा मार्ग सोडून देऊन कसला तरी नीरस कथाभाग घेऊन व पुढें पुढें तर मन:-कल्पित गोष्टी घेऊन त्यांवर नाटक रचावें असा प्रकार चालविल्यामुळें नाटकां-तील भारदस्तपणा नाहींसा होऊन त्याचीं गोडी कमी झाली." परंतु या स्वरू-पाच्या मनःकल्पितांच्या नाविन्यावरच साऱ्या दोषांचें खापर फोडणाऱ्या प्रतिगामी टीकेला न जुमानतां कल्पनारम्य नाटकांची परंपरा यापुढील कालखंडांतहि अखंड-पणें चालू राहिली. त्यांपैकीं कांहीं उल्लेखनीय नाटकें म्हणजे 'चंद्रसेना' (कृ. ब. केळकर १९०१), 'भुवनसुंदरी' (बा. वि. धामणकर १९०५), 'मंजु-भाषिणी' (कृ. दा. मळेकर १९०६), 'कामसेनरसिका' (शं. कृ. वझे १९०७) 'कुसुमवसंत' (कृ. गो. केळकर १९०७), 'कमला' (य. ना. टिपणीस १९११) 'मानापमान' (कृ. प्र. खाडिलकर १९११), 'कुसुमचंपा' (बा. दौ. राणे १९१२), 'राक्षसी महत्वाकांक्षा' (वा. गो. जोशी १९१४), 'इंदिरा' (शां. म. सोनाळकर १९१४), 'पुण्यप्रभाव' (रा. ग. गडकरी १९१७), हीं होत. मात्र कलादृष्टया हीं १९०० सालानंतरचीं नाटकें परिच्छेदारंभीं उल्ले-खिलेल्या नाटकांइतकीं सदोष राहिलेलीं नव्हतीं.

या अद्भुतरम्य नाटकांना मोठ्या प्रमाणावर व विधायक स्वरूपाच्या प्रय-त्नांनीं कोणी प्रथम लोकप्रिय केलें असेल तर तें श्री. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांनीं. केवळ चमत्कृतिपूर्ण कथानकावर पूर्वींचीं अद्भुतरम्य नाटकें तगत. श्री. कोल्हट-करांनीं याच्या जोडीला मार्मिक व चुरचुरीत संवाद, शब्दनिष्ठ व घटनोत्पन्न विनोद, चटकदार चालीचीं व काव्यमय कल्पना असलेलीं पदें हीं वैशिष्ट्यें आपल्या नाट-

कांत आणिलीं. नाट्यतंत्राच्या इतिहासांत नोंद करून ठेवण्यासारखी आणखीहि एक महत्त्वाची सुधारणा त्यांनीं आपल्या नाटकांतून केली. आत्तांपर्यंतच्या नाटकांतून प्रारंभीं कटाक्षानें घातला जात असलेला सूत्रधार व नटी यांचा प्रवेश त्यांनीं आपल्या



जन्म १८७१ — मृत्यु १९३४

श्रीपाद कृष्ण कोल्हटकर

नाटकांतून अजिबात काढून टाकिला. कोल्हटकरांनीं एकूण सुमारें १३।१४ नाटकें लिहिलीं; त्यांपैकीं प्रमुख नाटकें पुढीलप्रमाणें होत. 'वीरतनय' (१८९६), 'मूकनायक' (१९०१), 'गुप्तमंजूष' (१९०३), 'मतिविकार' (१९०८),

'प्रेमशोधन' ( १९१० ), 'वधूपरीक्षा' ( १९१४ ), 'सहचारिणी' ( १९१८ ), 'जन्मरहस्य, ( १९१८ ), 'परिवर्तन' ( १९२२ ).

यांपैकीं 'मूकनायक' हें नाटक अतिशयच गाजलें. त्यांच्या नाटकांचीं वैशिष्ट्यें म्हणून ज्यांचा वर उल्लेख केला आहे तीं सारीं ह्या नाटकांत आढळून येतात. तत्कालीन नाटकांत पडूं पहात असलेल्या संप्रदायानुसार नाटकांत कांहीं 'उपदेशा'चा भाग असावा म्हणून त्यांनीं 'प्रस्तुत नाटकांत मद्यापासून होणाऱ्या अपायांचें परोक्षतः थोडेंसें आविष्करण करण्याचा प्रयत्न केला आहे;' परंतु तो अत्यंत गौण स्वरूपांतच आहे. हें नाटक प्रथम १९०० सालीं 'विविधज्ञान-विस्तारां'त प्रसिद्ध झालें. नाटकाचा पहिला प्रयोग ता. २०।२।१९०१ रोजीं निपाणी येथील एका थिएटरांत किर्लोस्कर नाटक मंडळीनें करून दाखविला. हें नाटक गोष्टरूपानें पुढें दिलें आहे.

## मूकनायक : : नाटककार श्रीपाद कृष्ण कोल्हटकर

सरोजिनी : तुम्ही ओळखाल का माझा पण कोणता तो?

वीणारव : जानकीप्रमाणें एखादी जड वस्तु उचलण्यासंबंधाचा असेल ?

सरोजिनी : छे!

वीणारव : तर मग सत्येप्रमाणें वृषभांना जिंकण्याचा?

सरोजिनी : तो असता तर त्याकरितां फारशी तयारी करावी लागली नसती. कारण आमच्या दादाच्या दरबारांत एकेकापेक्षां एकेक मठ्ठ बैल बरेच सांपडतील.

वीणारव : तर मग द्रौपदीनें मत्स्यभेदाचा केला होता तसा तर नाहींना ?

सरोजिनी : याहिपेक्षां कठिण असें एखादें कर्म नाहीं का ?

वीणारव : नाहीं बुवा कांहीं कल्पना चालत! तूंच सांग आतां तुझा पण कोणता आहे तो.

सरोजिनी : ऐका तर, 'वारुणी'नें आमच्या दादाला सध्यां पूर्णपणें घेरलें आहे-तिच्यापासून त्याला सोडवा.

वीणारव : सरोजिनी, मद्यपी मनुष्याला व्यसनापासून सोडविणें ही गोष्ट सोप्यांपैकीं नव्हे.

सरोजिनी : हें मीं तुम्हांला आधींच सुचवून ठेविलें होतें. हं बोला लवकर, हें काम तुमच्यानें उरकेल किंवा नाहीं ?

वीणारव : सरोजिनी, यांत विघ्नें किती येणार आहेत, याची कल्पना तरी आहे का? आधीं मीं हें मुक्याचें व्रत धरिलें आहे त्यांमुळें उपदेशाच्या दोन गोष्टी सांगून पाहूं म्हटलें तर तेंहि होणार नाहीं.

सरोजिनी : मग माझा नाद सोडा.

वीणारव : जीवितांतील परम सुखाची आशा सोडून देणें ? तें मजकडून कदापि होणार नाहीं. सरोजिनी, शरश्चंद्र राजाला मदिरेपासून परावृत्त करण्याचा मी विडा उचलतों. जर ईश्वरकृपेनें त्यांत सिद्धि आली तर तूं आपलें वचन पूर्ण करशील ना ?

सरोजिनी : तें मजकडे लागलें. दादा आणि वहिनी माझ्याविरुद्ध वागणार नाहींत.

वीणारव : बरें, पण विक्रांत राजा तुजबद्दल मागणी घालणार आहे अशी चोहोंकडे बोलवा आहे.

सरोजिनी : विक्रांत राजाशीं मी विवाह करणार नाहीं अशी शपथ वाहतें पाहिजे तर.

वीणारव : हं, तेवढें मात्र करूं नकोस. माझा तुझ्या शब्दावर पूर्ण भरंवसा आहे.

राजा शरच्चंद्राची बहिण सरोजिनी व राजवाड्यांत नुकताच सेवेला राहिलेला एक नवा सेवक वीणारव यांच्यांत वरील संवाद चाललेला होता. वीणारवानें राजाची एक अमोल अशी कामगिरी केलेली असल्यानें राजवाड्यांत त्याचें आदरातिथ्य एखाद्या वरगुती माणसाच्या आस्थेनें व प्रेमानें राजघराण्यांतील सारी मंडळी करीत होती. राजा अपरात्रीं आपल्या मोटापासून दूर अशा ठिकाणीं

बेसुमार मद्यप्राशन करून झिंगून पडलेला असतांना अचानकपणें अज्ञात अशा चारपांच सशस्त्र मारेकऱ्यांनीं त्याच्यावर छापा घातला; व त्याला गिरफदार करून ते घेऊन जात असतांना अगदीं आकस्मिकपणें वीणारव आपल्या तीनचार सहकाऱ्यांसह तेथें आला. त्यानें त्या मारेकऱ्यांवर निकराचा हल्ला चढवून त्यांना पराभूत केलें व राजाला बंधमुक्त केलें. वीणारवाचें शस्त्रकौशल्य, निधडी छाती, बांधेसूद भव्य शरीरयष्टी व उमदा, तेजस्वी चेहेरा पाहून तो कोणीतरी अति उच्च घराण्यांतील असावा हें सहज लक्षांत येण्यासारखें होतें. राजानें साहजिकच आपल्या उपकारकर्त्याच्या नांवाची चवकशी केली, परंतु तो मुका असल्याचें त्याच्या लक्षांत आलें. राजानें त्याला मोठ्या सन्मानानें नगरांत आणिलें व साऱ्या प्रजाजनांसमवेत त्याचा मोठा गौरव केला. राजा आपल्या या प्राणदात्याचे आभार मानितांना इतका गहिंवरून आला कीं त्या भरांत त्यानें त्या मुक्याला आपलें अर्धें राज्यहि देऊं केलें, परंतु मुक्यानें त्या देणगीचा स्वीकार न करण्या-बाबतचा आपला विचार अति नम्रतेनें परंतु निश्चयानें व्यक्त केला व राजाची केवळ सेवा करण्याची आपली इच्छा असल्याचें खाणाखुणांनीं सुचविलें. अधिक चवकशी करतां त्याचें नांव वीणारव असल्याचें व त्याला कोणीहि आप्तेष्ट नसल्याचें कळून आलें. सहा महिन्यांपूर्वींच वडील वारल्यानें तेव्हांपासून नोकरीच्या शोधार्थ वणवण हिंडत असल्याचेंहि त्यानें हळुहळु स्पष्ट केलें. इतक्या विपन्नावस्थेंतहि त्याच्या मनोभूमिकेंत आढळून येणारा तो उमदेपणा पाहून राजाला फारच अचंबा वाटला. वीणारवाला त्यानें राजवाड्यांतच ठेवून घेतलें व अगदीं घरगुती माणसाच्या आस्थेनें व प्रेमानें त्याचें आदरातिथ्य करण्याबद्दल राजवाड्यां-तील दासदासींपासून खुद्द राणी रोहिणीपर्यंत साऱ्यांना बजाविलें.

राणी रोहिणी व राजभगिनी सरोजिनी ह्या दोघींना राजा शरच्चंद्र मारे-कऱ्यांच्या तावडींतून सुटल्याबद्दल जेवढा आनंद झाला तेवढाच त्याला दारूचें व्यसन लागल्याचा वृत्तान्त कळल्यानें विषाद वाटला. इतके दिवस राजाच्या निकट सहवासांत असूनहि त्यांना या गोष्टीचा पत्ता नव्हता. कारण आपलें व्यसन गुप्त राखण्याबाबत राजा अति दक्षता घेई. परंतु या गुप्तता राखण्याच्या त्याच्या कल्पने-

पायींच तो आपल्या गोटापासून दूर गेला व मारेकऱ्यांच्या तडाक्यांत सांपडला. इतका सारा प्रकार झाल्यावर त्याच्या व्यसनाचा भ्रम होण्यास फारसा वेळ लागला नाहीं. राणी रोहिणीनें एक दिवस फारच त्रागा केल्यानें तिच्या समजुतीखातर म्हणून राजानें दारूचें व्यसन सोडल्याची शपथहि घेतली. परंतु व्यसनी माणसांच्या शपथांचा जो नेहमीं शेवट होतो तोच त्याच्याहि शपथेचा झाला. रोहिणी व सरोजिनी अलिकडे नेहमीं अत्यंत सचिंत दिसत. राजाचें व्यसन असेंच वाढत गेलें तर त्यामुळें स्वराज्याला किती धोका आहे याची त्यांना स्वच्छ कल्पना होती. शिकंदराच्या स्वारीनंतर सारीं हिंदु राज्यें पार खिळखिळीं होऊन गेलीं होतीं. परकीयांच्या आक्रमणांमुळें व्हावयाची एकी बाजूलाच राहून उलट आपआपसांतील दुही मात्र दिवसेंदिवस वाढत होती. अंगदेशाचा राजा केयूर ह्याला सार्वभौम राजा होण्याची तृष्णा लागली होती; त्यामुळें तो शरच्चंद्राच्या राज्यावर डोळा ठेवून होताच; परंतु शरच्चंद्राचा मुख्य प्रधान यशोधन यानें राज्याचा बंदोबस्त व संरक्षणव्यवस्था इतकी कौशल्यपूर्ण व अद्ययावत् ठेविली होती कीं कोणाहि आक्रमकाला त्याची धास्तीच वाटावी. परंतु दिवसेंदिवस राजाभोंवतीं व्यसनी व दुर्वर्तनी मंडळींचा पसारा जसजसा वाढत चालला होता तसतसा वृद्ध यशोधनाचा दरबारांतील ‘ भाव ’ पडत चालला होता. यशोधनाच्या सल्लामसलतीची उपेक्षा करून राजा अलिकडे विकंठ नांवाच्या एका व्यसनी माणसाच्या तंत्रानें वागूं लागला होता. हा विकंठ अत्यंत दुष्ट व पाताळयंत्री असा गृहस्थ असल्यामुळें तो स्वराज्य केव्हां गोत्यांत आणील याचा नेम नव्हता. यामुळें राणी रोहिणी अलिकडे अतिशय चिंताक्रांत झालेली असे. या अशा अवघड प्रसंगीं तिला नेहमीं मदत करणारा तिचा आतेभाऊ व शेजारील राज्याचा स्वामी राजा विक्रांत ह्याची मदतहि ह्या वेळीं तिला लाभूं शकलेली नव्हती. कारण सहा महिन्यांपूर्वींच त्याचे वडील बाबासाहेब महाराज अचानकपणें वारल्याचें वृत्त ऐकून त्याच्या मनाला इतका जबरदस्त धक्का बसला कीं त्या भरांत राज्यव्यवस्था प्रधानाच्या हातीं सुपूर्त करून तो देशांतराला निघून गेला होता. जातांना बरोबर त्यानें मतीद नांवाचा एक त्याचा जिवश्चकंठश्च तरुण सरदार नेला [illegible]

होता. गेल्या सहा महिन्यांत त्या दोघांचा कोणालाहि थांगपत्ता नव्हता. यामुळें रोहिणीला आतां आपण अगदींच निराधार झाल्यासारखें वाटूं लागलें होतें. रोहिणीच्या या मनःस्थितींत व सरोजिनीच्या मनःस्थितींत काडीचेंहि अंतर नव्हतें. सरोजिनीला आपल्या भावाबद्दल अतिशय ओढ वाटत असे. भावाच्या व्यसनाधीनतेमुळें तिच्या ठिकाणची ही ओढ कमी न होतां उलट अधिकच वाढली होती. त्यामुळें तीहि सदैव भावाला व्यसनमुक्त कसें करावें या एकाच विचारांत अलिकडे गुरफटलेली दिसत असे. ती अशीच एकदां चिंतातुर मनःस्थितींत एकटीच बागेंत बसलेली असतांना अचानकपणें तेथें मुका वीणारव आला. तिनें खुणेनें त्याला 'राजा कोठें आहे' म्हणून विचारिलें. परंतु अति आश्चर्याची गोष्ट म्हणजे त्या मुक्यानें खुणांच्या सहाय्यानें उत्तर देण्याऐवजीं स्वच्छ वाणींत स्वमुखानें उत्तर दिलें. त्याला चांगलें बोलतां येत असून त्यानें मुक्याचें ढोंग कां घ्यावें हें सरोजिनीच्या लक्षांतच येईना. ती त्याला म्हणाली, "तुम्हांला चांगलें बोलतां येत असून तुम्ही हें मुकेपणाचें थोतांड कां उभारलेंत ?"

वीणारव : तें तुझ्या सौंदर्यालाच विचार. त्यानेंच मला मुकें करून येथें आणिलें. आणि त्यानेंच मला पुन्हां वाचा दिली.

सरोजिनी : मला अग जाग म्हणायला तुम्हांला लाज कशी नाहीं वाटत? तुम्ही कोणीहि असा. हल्लीं तुम्हीं आमचे बंदे नोकर आहांत हें लक्ष्यांत ठेवा.

वीणारव : आणि जन्मभर तसेंच राहण्याचा माझा संकल्प आहे.

सरोजिनी : अंतःपुरांत असा पांचटपणा करायला लागलें म्हणजे चतुर्भुज होण्याला उशीर लागत नाहीं.

वीणारव : मला तरी तेंच पाहिजे. तुझ्याशीं विवाह करून चतुर्भुज व्हावें हीच मनांतली इच्छा.

सरोजिनी : थांबा अं, मी दादाकडे निरोप पाठवितें कीं, हे गृहस्थ नगराबाहेर गेल्यावांचून मी अन्नग्रहण करणार नाहीं.

वीणारव : अन्नग्रहण नको करूं; पण पाणिग्रहण तर करशील कीं नाहीं ?

आपल्यासारख्या राजकन्येला इतक्या चमत्कारिक पद्धतीनें मागणी घाल-ण्याचें धाडस करणाऱ्या या माणसाचें डोकेंच फिरलेलें असावें अशी शंका आतां सरोजिनीला येऊं लागली. वेड्या माणसाशीं त्याच्या कलानेंच घेणें नेहमीं इष्ट असतें हें तिला चांगलें माहीत होतें. शिवाय तो वेडा असला तरी त्यानें आपल्या भावाचें प्राणरक्षण केलेलें आहे हेंहि तिच्या स्मरणांत अगदीं ताजें होतें. ह्या दुहेरी विचारामुळें वीणारवाचा अधिक अपमान करण्याच्या भरीस न पडतां तिनें संभाषणाचा विषय बदलण्याचा प्रयत्न केला. परंतु वीणारव कांहीं केल्या लग्नाच्या विषयापासून दूर जाईना, आणि गंमत अशीं कीं त्या दोघांच्या संभा-षणाचा ओघ जों जों वाढत होता तों तों त्याची बुद्धिमत्ता, त्याचें वाक्चातुर्य त्याच्या विचारांतील प्रौढत्व यामुळें ती त्याच्या अधिकाधिक आहारींच जाऊं लागली. आणखी कांहीं वेळानें तर तिची खात्रीच झाली कीं तो मुका एखादा सामान्य गृहस्थ नसून कोणीतरी उच्च घराण्यांतील परंतु कांहीं कारणानें अज्ञातवास पत्क-रलेला असा गृहस्थ असावा. आणि म्हणूनच शेवटीं तिनें आपण कोणत्या अटीवर त्याच्याशीं विवाह करण्यास तयार आहों तें त्याला ऐकविलें. त्या अटीची — पणाची हकिगत प्रारंभीं दिलेल्या संवादांत आलेलीच आहे.

राजा शरच्चंद्राचें व्यसन आटोक्यांत आणण्याकरितां वीणारव आपल्या-कडून प्रयत्नांची पराकाष्ठा करीत होता. या त्याच्या प्रयत्नांत विनोद नांवाचा नुकताच नेमिला गेलेला एक नोकर त्याला अतिशय साहाय्य करीत असे. त्या दोघांची एका आठवड्यांतच येवढी गट्टी जमली कीं तिऱ्हाइताला वाटावें यांची गेल्या कित्येक वर्षांची मैत्री आहे. त्या दोघांनीं मिळून राजाला व्यसनमुक्त करण्याकरितां एक अगदीं अभिनव शक्कल शोधून काढिली होती. राजा सुरेचा पेला अगदीं ओठांस लावण्याच्या ऐनवेळीं वीणारव विनोदामार्फत शत्रु-हल्लयांच्या व हालचालींच्या खोट्या बातम्या त्याच्या कानावर घाली. त्या ऐकतांच राजा एकदम भानावर येई व सैन्याच्या व्यवस्थेला लागे. त्या दोघांची ही युक्ति राजाचा व्यसनी मित्र विकंठ ह्याच्या लक्षांत आली होती; आणि त्यामुळेंच तो या जोडमोळीवर अगदीं चिडून होता. या दोघांना राजाच्या सान्निध्यांतून कसें

काढावे ह्या विचारांत तो नेहमीं असे. या दोघांना शह देण्यासाठीं म्हणून त्यानें मुद्दाम आपला एक मयूर नांवाचा हस्तक बहिऱ्याचें सोंग देऊन राजवाड्यांत ठेविला. तो विकंठाच्याहि फारसा परिचयाचा नव्हता. तो परमुलखांतला दिसत होता; परंतु एकंदर बोलण्याचालण्यावरून तो बराच तल्लख वाटे आणि म्हणूनच विकंठानें त्याच्या आगापिछाची फारशी उठाठेव न करितां राजाजवळ त्याची शिफारस करून त्याला राजवाड्यांत खाजगी तैनातींतील सेवक म्हणून नेमविलें. हा नवा सेवक व विकंठ मिळून राजा जास्त जास्त व्यसनाधीन कसा होईल ह्याच्या खटपटींत सदैव असत. आजचा प्रसंग तसाच होता. राजाच्या वाढदिवसानिमित्त फार मोठा उत्सव दरसालप्रमाणें नागरिक स्वयंस्फूर्तीनें साजरा करीत होते. सकाळचा मुख्य समारंभ आटोपल्यावर भोजनोत्तर राजा जेव्हां विश्रांतीसाठीं म्हणून वाड्यांत आला तेव्हां त्याला एकट्याला जरा एकान्तांत गांठून विकंठ मद्यपानाचा आग्रह करीत होता. या त्याच्या बेतांत व्यत्यय आणण्यास कोणी येऊं नये म्हणून त्यानें बाहेरच्या बाजूला केयूराला पहाऱ्यावर उभा केला होता. राजा खुषींत आहे असें पाहून विकंठानें मोठ्या कौशल्यानें आपल्या विषयाला सुरुवात केली.

विकंठ : महाराज, अशा महोत्सवाचे वेळीं एका वस्तूची फार आठवण येते. तिजवांचून सर्व शून्य वाटत आहे.

शरच्चंद्र : ती कोणती?

विकंठ : वारुणी.

शरच्चंद्र : त्या वारुणीचें नांवहि ऐकावयाला नको.

विकंठ : त्या दिवसापासून आपण असें वैराग्य काय धारण केलें आहे हें? अहो, त्या दिवशींचा तो रानांतला प्रसंग केवळ या मदिरेमुळें आला असें का आपणाला वाटतें? ज्यावेळीं ज्या गोष्टी होणार त्या कधीं चुकावयाच्या नाहींत.

शरच्चंद्र : हें तत्त्वज्ञान आतां मला कसें फिक्कें वाटूं लागलें आहे. मला इतके दिवस वाटत होतें कीं, राहूलाच डोकें नाहीं. पण सर्व मद्यपी मस्तकनिरहित राहू आहेत अशी माझी पक्की खात्री झाली आहे. तो अमृताचा वांटेकरी होऊं

लागला म्हणून आपल्या मस्तकाला मुकला, आणि आम्ही विषाहिपेक्षां भयंकर अशा सुरेचें सेवन करूं लागलों म्हणून मस्तकें दवडून बसलों.

विकंठ : मला तर वाटतें कीं, मद्यामुळें मस्तक समतोल रहातें.

शरच्चंद्र : मस्तक तर नाहीं, पण शरीर मात्र समतोल होतें खरें. कारण जों जों उदर मोठें होत जातें तों तों मस्तक हलकें होत जातें.

विकंठ : पण मद्य हें समुद्रमंथनापासून निघालेलें एक रत्न मानिलें आहे.

शरच्चंद्र : त्याचप्रमाणें चाबकालाहि चौदावें रत्न मानिलें आहे. जो मद्य पिईल त्यानें चाबकाचे प्रहार सोसण्यास तयार झालें पाहिजे. मजविषयीं विचारशील तर मीं आजपासून मद्याला अगदीं शत्रूसारखें लेखणार.

विकंठ : माझी विनंती तरी हीच आहे कीं, आपण तें शत्रूप्रमाणें मानावें आणि इतर शत्रूंचा जसा आजपर्यंत फडशा पाडिला तसें याचें सेवन करून हेंहि जगांतून नाहींसें करावें.

शरच्चंद्र : विकंठा, तुला खरें सांगूं ? मी प्रियेला वचन देऊन चुकलों आहें. म्हणून हा तुझा उपदेश म्हणजे पालथ्या घागरीवर पाणी !

विकंठ : इतकेंच ना ? मग या कानाचें त्या कानाला न कळतां सर्व सोय करणें हें माझें काम !

शरच्चंद्र : विकंठा, वचनभंग करण्याचा मला उपदेश करितोस ?

विकंठ : महाराज, आपणाला खरें सांगूं ? मद्यासारखें आसव एकदम सोडून देऊं नये. आज आपण थोडेंसें प्यायलांत तर वचनाविरुद्ध वागल्यासारखें होणार नाहींच उलट तें वचन चांगल्या सुरक्षितरीतीनें पार पाडल्यासारखें होईल. कां ? महाराज मी म्हणतों तें खरें आहे ना ?

शरच्चंद्र : खरें आहे !

विकंठ : तर मग असे उदास होऊं नका. मी स्वतः हें व्यसन सुटण्याविषयीं आपल्याला मदत करीन. दररोज मदिरा थोडी थोडी कमी करीत शेवटीं तिला आजिबात फांटा द्यावा. आपण माझ्यावर सर्व हवाला ठेऊन असा. आणि हें पहा आतां अधिक विचार करून याबाबत डोक्याला व्यर्थ शीण देऊं नका. चला.

शरच्चंद्र : चल बाबा.

आणि नंतर ते दोघेहि अंतर्मंदिरांत गेले. बाहिरा मयूर दाराला कान देऊन त्यांचें संभाषण एकाग्रचित्तानें ऐकत होता. त्याचें सारें लक्ष आंतल्या व्यक्तींच्या हालचालीकडे व संभाषणाकडे गुंतलेलें असल्यानें त्याच्यामागें विनोद केव्हां येऊन उभा राहिला हें त्याच्या ध्यानांतच आलें नाहीं. विनोद आपल्या हालचाली पहात आपल्या मागेंच उभा आहे हें त्याच्या लक्षांत जेव्हां आलें तेव्हां मात्र तो कमालीचा ओशाळला. परंतु तरीहि जणुं कांहीं कांहींच झालें नाहीं अशी अविकारी मुद्रा करीत तो उलट विनोदालाच म्हणाला, "काय–काय पहात आहां ?"

विनोद : एका सर्पाच्या हालचाली पहातों आहे !

मयूर : मला ऐकूं येत नाहीं तुम्ही काय म्हणतां तें.

विनोद : हें पहा आतां हें ढोंग चालावयाचें नाहीं. जर का आपला बहिरेपणा मजपाशीं एक पळभर टिकूं द्याल तर तुम्ही खरेच बहिरे बनून जाल अशी मी राजवाड्यांत ओरड करीन.

मयूर : मी पायां पडतों. कृपा करून असें कांहीं करूं नका.

विनोद : तर मग आपलें खरें स्वरूप प्रकट करा.

मयूर : करतों, परंतु ह्यांतलें एक अक्षरहि बाहेर फुटणार नाहीं, येवढेंच नाहीं तर उलट माझ्या यापुढील कांहीं कामांत तुमचें सहाय्य मला मिळेल असें आधीं वचन द्या.

विनोद : हें घ्या वचन.

मयूर : ऐका तर मग. अंगपूरचें राज्य तुम्हांला ठाऊक असेलच. तेथला मी राजा. माझें नांव केयूर. या देशाचा सार्वभौम राजा व्हावें अशी इच्छा धरून मीं बरोबर सैन्य घेतलें, आणि प्रथम सर्वांत बलिष्ठ राजा जिंकण्याच्या उद्योगाला लागलों. शरच्चंद्र व्यसनाधीन झाला आहे हें ऐकतांच मला जास्तीच स्फुरण चढलें; आणि राजा बेसावध आणि तर्रर झालेला पाहून मीं एकदम त्याच्यावर आणि विकंठावर छापा घातला. आपलें गुप्त व्यसन कोणासहि कळूं नये म्हणून त्यांनीं शरीरसंरक्षक किंवा हत्यारीपात्यारहि बरोबर घेतलेलें नव्हतें; तेव्हां मला हल्ला करणें

फारच सोपें गेलें. तो मुका जर आयत्या वेळीं तेथें आला नसता तर सगळें साधलें असतें. असो; नंतर मला मंत्रिमंडळांतहि जाण्यास मज्जाव नसावा म्हणून मी बहिऱ्याचें मिष करून राजाची नोकरी धरिली, आणि या दुर्गम नगरांत प्रवेश करून घेतला. आतां तुमचें सहाय्य यापुढें मिळालें तर मला त्यामुळें फारच मोठी मदत होणार आहे. कारण तुमच्यामार्फत माझे निरोप मला माझ्या सेनापतीला कळवावयाला सांपडतील. तुमच्याजवळ बाहेर जाण्यायेण्याचा खास परवाना आहेच.

विनोद् : मी मोठ्या आनंदानें आपलें हें काम करीन.

मयूर : पण यांतलें एकहि अक्षर त्या मुक्याला—

विनोद् : छेः, छेः ! त्याची अगदीं काळजीच नको तुम्हांला. आणि तुम्हांला आतां अगदीं दिलांतली गोष्ट सांगावयाची म्हणजे मी त्याचा पक्का हाडवैरी आहें. त्यानें माझें फार मोठें नुकसान केलेलें आहे. त्यानें मला अजून ओळखलें नाहीं, पण मी मात्र त्याला चांगलाच ओळखून आहें.

मयूर : तरीच नेहमीं त्याच्या पाठीशीं—

विनोद् : अगदीं एखाद्या राहूसारखा असतों ! बाह्यात्कारीं मात्र मला त्याच्याशीं स्नेह दाखविणें भाग आहे. कारण त्याच्या शक्तीपुढें माझें एकट्याचें कांहींच चालणें शक्य नाहीं !

मयूर : त्याचें व तुमचें वैर आहे ही गोष्ट आपणा दोघांना अधिक जवळ येण्यास उपयुक्त अशीच आहे. आतां दुसऱ्या एका इसमाला आपल्या कटांत घेण्याचा माझा बेत आहे ! कोण असेल तो ओळखा पाहूं—?

तेवढ्यांत हातांत मद्याची सुरई घेऊन विकंठाची स्वारी बाहेर आली त्याला पहातांच अदबीनें वांकून मयूर म्हणाला, " विकंठ महाराजांना शंभर वर्षें आयुष्य आहे ! "

विकंठ : कारे बहिऱ्या, माझी फारशी खुशामत करतोस ?—तुला लागली वाटतं बातमी एवढ्यांत ?

मयूर : कोणती बातमी ?

विकंठ : यशोधन प्रधानाला कमी करून मला त्या जागीं नेमल्याची !'

विनोद : वाः योग्य जागीं नेमणूक !

मयूर : विनोदा, मूर्खा विकंठाच्या योग्यतेच्या मानानें ही जागा तुला कमी नाहीं वाटत ? वास्तविक पहातां यांना याहून मोठी जागा मिळणें अधिक उचित नव्हे काय ?

विकंठ : म्हणजे ? मी नाहीं समजलों तुमच्या बोलण्यांतील अर्थ ?

मयूर : म्हणजे समजा उद्यां जर कोणी तुम्हांला या राज्याचे मांडलिक राजे म्हणून कां होईना पण नेमलें तर तें तुम्ही नाकाराल का ?

विकंठ : मी हातचें सोडून पळत्याच्या पाठीला कधीं लागणार नाहीं !

मयूर : दारूच्या निशेंत दिलेलें ऐश्वर्य तुम्ही हातचें समजत असाल !

विनोद : विकंठ महाराज तुम्ही ह्या मयूरांना अजून ओळखलें नाहींत ! हे अंगदेशचे महाराज केयूर हा देश काबीज करण्याकरितां गुप्त वेषानें येथें आले आहेत !

विकंठ : असे बुदबळांतले राजे मी पुष्कळ पाहिले आहेत ! यांना कशाच्या आधारें राजे मानावयाचें ?

मयूर : तुम्हांला संशय वाटत असेल तर ही पहा माझ्या नांवाची मुद्रा.

विकंठ : आतां मात्र माझा संशय दूर झाला. माफ करा माझ्या आतांपर्यंतच्या वर्तनाबद्दल. सांगा मला कोणती कामगिरी मी आपल्याकरितां करूं शकतों ती.

मयूर : निराळी नाहीं, सध्यां करीत आहांत तीच ! राजाला अधिकाधिक व्यसनाधीन करावयाची. त्याहून आणखी काम येवढेंच कीं माझ्या गरजेप्रमाणें निरनिराळ्या परवानग्यांवर राजा निशेंत असतांना त्याच्याकडून सह्या घ्यावयाच्या.

विकंठ : अः ! तें काम म्हणजे माझ्या हातचा मळ आहे.

आणि नंतर पुन्हां एकदां या नव्या कराराबाबत त्या तिघांच्या आणाशपथा होऊन ते तिघे तीन दिशांना निघून गेले.

यशोधनाला प्रधानपदावरून दूर केल्यापासून राजा शरच्चंद्राच्या वागणुकीला कांहीं ताळतंत्र उरला नाहीं. दिवसभर तो दारू पिऊन तर्रर असल्या-

मुळें विकंठाच्या हातांतच सारीं सूत्रें गेल्यासारखें झालें होतें. आणि विकंठाला स्वतःची अशी बुद्धि फारच थोडी असल्यामुळें तो सर्वस्वीं मयूराच्याच कलानें चालत असे. मयूराला यामुळें तर अगदीं फावल्यासारखें झालें होतें. त्यानें राजा शरच्चंद्र धुंदींत असतांना विकंठामार्फत इतके नाना तऱ्हेचे परवाने मिळ-वून ठेविले होते कीं अवघ्या दोन चार दिवसांतच बाहेर दबा धरून राहिलेल्या त्याच्या सैन्याच्या मदतीनं तो सबंध राज्य सहज जिंकूं शकला असता. तो आपले सारे निरोप विनोदामार्फत बाहेर पोहोंचविण्याची सोय करी. आणि विनोदहि तें काम मोठ्या सचोटीनें करितांना दिसे. मात्र कोणताहि निरोप घेऊन वेशीबाहेर पडण्यापूर्वी त्याचें मुख्य वीणारवाबरोबर कांहींतरी खलबत होत असे ही गोष्ट मात्र त्याच्या लक्षांत कधींच आली नसल्यामुळें तो त्याच्यावर पूर्णपणें भरंवसून होता. विनोदाबाबत त्याला इतका विश्वास वाटत असे कीं तो आपलीं अत्यंत खाजगी कामेंहि त्यालाच करावयाला सांगे. दोन दिवसांपूर्वी त्यानें असेंच एक नाजुक काम विनोदाच्या अंगावर सोंपविलें होतें. वृद्ध यशोधनाची मुलगी वेत्रिका हिला त्यानें मागणी घातली होती, परंतु तिनें सपशेल नकार दिल्यामुळें तो अगदीं निराश झाला होता. म्हणून त्यानें विनोदाला तिच्याकडे रदबदली-करितां पाठविलें. विनोद त्याप्रमाणें वेत्रिकेकडे गेला. परंतु ती कांहीं केल्या त्याच्याशीं बोलावयासच मुळीं तयार होईना. आणि जेव्हां ती बोलूं लागली तेव्हां इतके अपमानकारक शब्द ती उच्चारूं लागली कीं कोणीहि मानी मनुष्य एक क्षणहि त्या घरांत राहिला नसता. पण विनोदानें मात्र कोडपणा करून आपलें संभाषण तसेंच चालू ठेविलें होतें. शेवटीं ती रागानें म्हणाली, "मी सगळ्या पुरुष जातीचा द्वेष करतें हें जर तुम्हांला कळलें तर तुम्ही इतका कोडपणा खास करणार नाहीं."

विनोद : तसें असेल तर मग तुझीं माझीं मतें फारच जुळतात. कारण मी साऱ्या मनुष्य जातीचा द्वेष्टा आहें. चल तर आपण दोघेहि मिळून मनुष्याच्या सहवासापासून दूर अशा अरण्यांत वास करूं. बरें पण वेत्रिके, इतका तुला आमचा तिटकारा येण्याचें कारण सांग पाहूं.

वेत्रिका : लहानपणीं माझ्याहून थोडासा मोठा असा एक पोरका मुलगा आमचे येथें आश्रयाला होता. त्याच्या अंगच्या गुणांमुळें मी त्याला मनानें वरलें होतें. त्यालाहि अर्थातच ती गोष्ट संमत होती. परंतु एके दिवशीं तो एकाएकी जो नाहींसा झाला त्याचा आजतागायत पत्ता नाहीं. तो मला न कळवतां गेल्यानें मला त्याचा भयंकर संताप आला. आणि तेव्हांपासून एकंदर पुरुष जातीचाच मला अति तिटकारा आला आहे !

विनोद : कारणाशिवाय अशी सुंदर स्त्री सोडून जाणें आणि पुनः तिचा समाचारहि न घेणें ही मला तर कपोलकल्पित गोष्ट दिसते. तथापि माझ्या स्वतःच्या वृत्तान्ताशीं इचें पुष्कळच साम्य आहे. मी लहानपणीं अशाच एका राजधानींत होतों. तेथें माझी प्रीति तुझ्यासारख्याच एका सुंदर व चतुर अशा कन्येवर बसली. पुढें माझ्या आणि तिच्या ऐश्वर्यांत जमीन-अस्मानाचें अंतर असल्यामुळें त्या मुलीच्या पित्याला आमचें प्रेम आवडेनासें झालें. सर्व गोष्टी पैशाकरितां, पैशाशिवाय कोणी कोणास विचारीत नाहीं—पुसत नाहीं असें दिसतांच तशा लहान वयांत सुद्धां मला वैराग्य आलें, आणि मीं दूरदेशीं पळून गेलों. चांगल्या योग्यतेला चढल्यावर लहानपणच्या सोबतिणीला भेटावें म्हणून परत आलों, तों काय चमत्कार सांगावा ? वेत्रिके, तुजप्रमाणें तीहि मजकडे पाठ फिरवून बसली !

वेत्रिके : माझी गोष्ट जशी तुम्हांला कपोलकल्पितच वाटली तशीच तुमचीहि मला दंतकथेप्रमाणेंच वाटूं लागली आहे.

विनोद : कांहीं असो. मला सांगावयाचें म्हणून इतकेंच कीं तुझें माझें पुष्कळ गोष्टींत जुळतें. तूं पुरुषांची द्वेष्टी, मी मनुष्यजातीचा द्वेष्टा ! तुझी कपोलकल्पित कथा, तशीच माझी दंतकथा !! तुझें नांव वेत्रिका म्हणजे छडी, तर माझें नांव प्रतोद म्हणजे चाबूक !!!

वेत्रिका : म्हणजे तुमचें नांव विनोद कीं प्रतोद ?..:अगबाई खरंच कीं—तूंच तो प्रतोद ! केवढा झाला आहेस प्रतोद ? मी अगदीं मुळींच तुला ओळखलं नाहीं हो ऽ !

विनोद : मी मात्र तुला पुरा ओळखून आहे !...बरं तें असो. वेत्रिके आतां तरी तुझे वडील आपल्या विवाहाला परवानगी—

वेत्रिका : हें पहा तें काम आतां माझ्याकडे लागलं !—परंतु आधीं तुम्ही त्या मेल्या मयूराला त्याच्या उद्दामपणाबद्दल चांगलें शासन केलं पाहिजे. तो परवां इथें आला होता तेव्हां मला उद्देशून कायकाय बोलला तें जर आपणाला कळलें असतें, तर मी सांगण्याच्या अगोदरच आपण त्याचें पारिपत्य केलें असतें.

प्रतोद : मला ती सर्व हकीगत कळली आहे; आतां आधीं आंत चल; आणि मी सांगतों तसें एक पत्र मयूरला उद्देशून लिही पाहूं. म्हणजे त्याला या रात्रींतच साफ गोत्यांत आणतों."

वेत्रिकेनें लिहिलेलें पत्र घेऊन विनोद थेट मयूराकडे परत आला. मयूरानें अधीरपणानें तें पत्र घेऊन वाचावयास सुरुवात केली. त्या पत्रांत पुढीलप्रमाणें मजकूर होता.

श्री सकलगुणैश्वर्यमंडित मयूर महाराज यांच्या सेवेसी दासी वेत्रिका इचे अनेक साष्टांग प्रणिपात विशेष. आपण माझें मन हिरावून नेलें आहे. आपणास मीं कोप दाखविला, पण तो अगदीं खरा नव्हता. तर तो विसरून एकवार दर्शन द्याल अशी आशा आहे. मी आज रात्रीं स्मशानाच्या पूर्व भागास कांहीं नोकर तयार ठेवितें. तेथें आपण मध्यरात्रीचे सुमारास एकटें यावें. ते आपणांस प्रथम धाक दाखवतील; इतकेंच नाहीं, तर आपल्या अंगावर हात देखील टाकतील. पण हें सर्व आपल्या परीक्षे-करितां. खरें प्रेम अशा संकटांना भीत नाहीं. आपण त्यांचें वर्तन निमूटपणें—म्हणजे एकहि शब्द न उच्चारतां—सहन केल्यावर ते लोक आपणाला जवळच असलेल्या रथांत घालून माझ्या निवासस्थानीं आण-तील. ही विवाहपद्धति आपणांस जराशी विलक्षण वाटेल; पण नाइलाज आहे. ती माझ्या कुळांत परंपरागत असल्यामुळें मला अनुसरली पाहिजे.

आपली
—वेत्रिका

त्याचें पत्रवाचन होतांच विनोदानें विचारिलें, "महाराज" तुम्ही हें साहस करण्यास तयार आहांत काय ?"

मयूर : अगदीं एका पायावर ! पण तुम्हींहि मजबरोबर असलां पाहिजे. नाहींतर त्या स्मशानांत—

विनोद : असे भिऊं नका ! पण महाराज, मला यां पत्रावरून आणखी एक और कल्पना सुचली आहे ! तिच्याप्रमाणें वागल्यास जातां जातां आणखीहि एक काम सहज होऊन जाईल.

मयूर : पण कल्पना तर सांग.

विनोद : आज त्या मुक्याला गुप्तपणें हद्दपार करण्याची राजाज्ञा झाली आहेना त्याच्यावर महाराजांची केवळ सहीच आहे; आंतला मजकूर अजून भरायचाच आहे.

मयूर : बरें मग ?

विनोद : त्या राजाज्ञेमध्यें असा मजकूर लिहा कीं, 'स्मशानाच्या पश्चिमभागीं एक मुका मनुष्य उभा असलेला दिसेल; तो मुका आहे कीं नाहीं हें ओळखण्याकरितां त्याला चांगला खरपूस मार द्यावा, व त्याचा मुकेपणा निश्चित केल्यावर त्याला शहराबाहेर हांकलून द्यावें.'

मयूर : तुमचें डोकें बरेंच कल्पक आहे कीं ! पण कायहो विनोद या आजरात्रीच्या योजनेंतील तो मुका आणि ते वेत्रिकेचे नोकर जर ठरल्याप्रमाणें आले नाहींत तर मला मुका समजून सरकारी नोकर माझीच संभावना करावयाचे !

विनोद : छेः छेः हा विचार सुद्धां मनांत आणूं नका. त्या मुक्याला आणि वेत्रिकेच्या नोकरांना बरोबर वेळच्यावेळीं तिथें आणण्याची कामगिरी लागली माझ्याकडे.

मयूर : तर मग माझी या बेताला पूर्ण संमति आहे.

त्या दोघांचे हे बातबेत चालले असतांनाच तिकडे राजवाड्यांतील बागेंत वीणारव मोठी दुःखी मुद्रा करून राजभगिनी सरोजिनीचा निरोप घेत होता.

सरोजिनी : शेवटची भेट !—आणि ती कां ?

वीणारव : ज्याला आपली प्रतिज्ञा अजून पूर्ण करतां येत नाहीं त्यानें—

सरोजिनी : कां बरं. असं कां तुम्ही म्हणतां ? वहिनी तर कालच मला सांगत होती कीं, दादा आतांशा पुष्कळच निवळला आहे म्हणून.

वीणारव : सरोजिनी, हा निव्वळ तुमचा भ्रम आहे. आज तर त्या व्यसनानें इतकी उलट खाली कीं, इतका बेफाम झालेला मी शरच्चंद्र राजास कधींहि पाहिला नाहीं. त्या आवेशांत त्यानें त्या अष्टमीच्या चंद्राच्या मुहूर्तावर मलाहि अर्धचंद्र दिला.

सरोजिनी : तुम्हीं अशा संकटांतून त्याला वांचवून सुद्धां त्यानें असें केलें ना ? देवा, माझ्या दादाला चांगली बुद्धि दे ! त्याचें आतां कसें होईल ?—वीणारव, निदान तुम्हीं तरी अशा बिकट प्रसंगीं आम्हांला सोडून जाऊं नका ना—? त्या पणांतून मी तुम्हांला आपण होऊन मुक्त करावयास तयार आहें.

वीणारव : छे, छे, ती गोष्ट होणें नाहीं. पणांतून अशा निंदास्पद रीतीनें मोकळा होऊन हें कृष्णमुख दाखवूं कोठें ?—आणि अजूनहि मी प्रयत्न केला असता परंतु माझा पण सिद्धीस नेण्यास तूं मला जी मुदत दिली होतीस ती उद्यां संपते. आणि उद्यांच बहुधा विक्रांत राजानें तुला मागणी घालण्याकरितां म्हणून पाठविलेला प्रतिनिधी दरबारांत उपस्थित होईल अशी दाट वदंता नगरांत आहे.

सरोजिनी : एकूण दैव माझ्या पाठीस हात धुवून लागलें आहे तर. आतां मी आपणांस पणांतून मोकळें करीत असूनहि ज्याअर्थी आपण आपला आग्रह सोडीत नाहीं, त्याअर्थी मीहि एक प्रतिज्ञा करितें. विक्रांत राजानें एक सोडून हजार प्रतिनिधि पाठविले तरी माझें एकच उत्तर.

वीणारव : कशाला व्यर्थ भलत्यासलत्या प्रतिज्ञा करतेस !—हें बघ आतां विक्रांत आणि तूं खुशाल सुखानें कालक्रमण करा. मात्र सुखाच्या घटकेंत माझी आठवण होऊं देऊं नकोस एवढेंच माझें मागणें आहे ! बाकी अशा समयीं माझी आठवण तरी कोठून होणार म्हणा !

या त्याच्या खिन्नोद्गारावर सरोजिनी कांहीं म्हणणार तोंच वीणारव तिच्या दृष्टीआडहि झाला. तो त्या रात्रीं खरोखरीच परत आला नाहीं. त्याच्या आसपास अगदीं सांवलीसारखा वावरणारा असा जो विनोद त्याचाहि त्या रात्रीं

राजवाड्यांत पत्ता नव्हता. 'मला एका तांतडीच्या कामाकरितां बाहेर जावयाचें आहे' असें सांगून बहिरा केयूरहि भोजनोत्तर कोठेंतरी पसार झाला होता. वीणारवाचा पत्ता काढण्याकरितां विश्वासानें पाठविण्यासारखा असा कोणीहि सेवक तिच्या डोळ्यापुढें येईना. या स्वतःच्या असाहाय्यतेच्या जाणीवेनें ती फारच चिडचिडल्यासारखी झाली. आणि त्यांतच भर म्हणून कीं काय तिला मध्येंच वीणारवाचें तें शेवटचें वाक्य आठवे : "...बाकी अशा समयीं माझी आठवण तरी कोठून होणार म्हणा !"—या वाक्याची स्मृति तिच्या चित्तांत फारच खुपे. साऱ्या रात्रभर सारखी या कुशीवरून त्या कुशीवर अशी तळमळत ती राहिली. मध्येंच किंचित डोळा लागे पण तेवढ्या अल्पावधींतच इतकीं भयंकर स्वप्नें पडत कीं नको ती निद्रा असें तिला होऊन जाई !

दुसऱ्या दिवशीं ज्या संकटाला ती भीत होती तेंच नेमकें तिच्यापुढें येऊन उभें राहिलें. राजा विक्रांतानें मागणी घालण्याकरितां म्हणून पाठविलेला एक वयोवृद्ध प्रतिनिधि शरच्चंद्राच्या राजवाड्यांत उपस्थित झाला. राजाराणींनें फारच मोठ्या थाटांत त्याचें स्वागत केलें. राणीचें विक्रांतांशीं असलेलें नातें व विक्रांताच्या राज्याकडून राजा शरच्चंद्राला वेळोवेळीं होत आलेली सर्व तऱ्हेची मदत ही लक्षांत घेतां हें स्वागत स्वाभाविकच होतें. आणि त्यांतून या नव्या जोडल्या जाणाऱ्या संबंधामुळें तर केवळ राजाराणीलाच नाहीं तर साऱ्या प्रजाजनांनाच अतिशय समाधान व स्वास्थ्य लाभणार होतें. सरोजिनीलाहि या मागणीमुळें अतिशय आनंद होईल अशी सर्वांचीच कल्पना होती. कारण तिचें रूप व गुण लक्षांत घेतां आसपासच्या आठ दहा राज्यांत तिला इतका अनुरूप वर सांपडणें कठीणच होतें. एकट्या सरोजिनीखेरीज साऱ्यांनाच हा संबंध अगदीं शंभर टक्के पसंत होता. त्या वकिलादेखत शोभा नको म्हणून सरोजिनीनें आपली मैत्रिण चेत्रिका हिच्यामार्फत स्पष्ट शब्दांत आपला नकार राणीच्या कानावर घातला. हा तिचा नकार कळविण्यासाठीं चेत्रिका जेव्हां राणी रोहिणीच्या अंतर्महालांत गेली तेव्हां विनोद राणीशीं कांहींतरी हलक्या आवाजांत बोलत असलेला तिला आढळला. त्याला तेथें पहातांच ती लाजून परतूं लागली

तेव्हां राणी तिला म्हणाली, " हं लाजूं नका आतां. साऱ्या गोष्टी तुझ्या आधींच मला कळल्या आहेत. खरं कीं नाहीं प्रतोद ?—आणि आतां तूं कोणाचा काय निरोप घेऊन आली असशील त्याचा देखील मला चांगला अंदाज आहे." राणीचें तें बोलणें ऐकून वेत्रिका अगदीं चकितच झाली. आणि राणीनें नंतर तिच्या कानांत मुक्या वीणारवाचें खरें नांव जेव्हां सांगितलें तेव्हां तर ती अगदीं आश्चर्यानें दिङ्मूढच झाली ! अंतर्यामीं कमालीची आनंदून परंतु बाह्यात्कारीं दुःखाचा आविर्भाव दाखवीत ती परत सरोजिनीच्या महालांत आली व म्हणाली, " तुझा नकार ऐकून राणीसाहेब भारीच रागावल्या बाई ! आणि त्यांनीं व राजेसाहेबांनीं तर आतां अगदीं निश्चयच केला आहे कीं तुझा विवाह विक्रांत महाराजांशींच करावयाचा. आणि खरं सांगूं, मलाहि यांत कांहीं गैर दिसत नाहीं ! त्यांतून बघ बाई तूं आपलं आतां ! " असें म्हणून वेत्रिका, सरोजिनी कांहीं बोलण्यापूर्वींच चटकन् महालाबाहेर पडली.

दुपारीं भोजनोत्तर राजा शरच्चंद्राच्या राजवाड्यांतील दिवाणखान्यांत राजा, राणी, सरोजिनी, वेत्रिका व तो विक्रांत राजाचा वृद्ध प्रतिनिधि एकत्र बसून विवाहाबाबत बोलणीं करीत होते. सारेजण सरोजिनीला तिचा नकार कसा अनुचित व अविचारी आहे हें परोपरीनें समजावून सांगत होते. परंतु सरोजिनीचा नकार अढळ होता ! शेवटीं त्या वृद्ध प्रतिनिधीनें आपल्या राजाची बरोबर आणलेली तसबीर सरोजिनीच्या हातांत दिली व राजाच्या मोहक सौंदर्यानें तिचा निश्चय बदलतो आहे कीं काय ह्याचा तो अंदाज घेऊं लागला. त्या तसबिरींतील विक्रांत राजाच्या मुद्रेंत व मुक्या वीणारवाच्या मुद्रेंत असलेलें साम्य पाहून सरोजिनीला अतिशय आश्चर्य वाटलें. परंतु हा सारा आपल्या मनाचा तर खेळ नाहींना अशा शंकेनें तिनें वेत्रिकेकडे प्रश्नार्थक दृष्टीनें पाहिलें. परंतु खट्याळ वेत्रिकेनें आपलें तिकडे जणुं लक्षच नाहीं असा आविर्भाव दाखवून तिची निराशा केली ! सरोजिनीचें हें अवलोकन चालू असतांनाच राणी रोहिणीनें विचारलें, " वन्सं, ही तसबीर तुमच्या मनांत कशी काय उतरली ? "

सरोजिनी : वहिनी, माझ्या मनांत आतां परपुरुषाला जागाच नाहीं.

रोहिणी : लग्नापूर्वी सगळेच परपुरुष असतात. पण त्यांतली निवड केलीच पाहिजे कीं नाहीं ?

चंद्रिका : राणीसाहेब, त्यांची निवड होऊन चुकली आहे.

प्रतिनिधि : होऊन चुकली नसेल, चुकून झाली असेल !

शरच्चंद्र : सरोजिनी, तूं शहाणी आहेस. या तुझ्या नकाराचा काय परिणाम होईल हें ठाऊक आहे का तुला ? तुझ्या अविचारामुळें केवढें संकट ओढवणार आहे ह्याचा अंदाज आहे का तुला ?

प्रतिनिधि : आमच्या महाराजांच्या रागाची कल्पना आली म्हणजे माझ्या या वृद्ध पणाचें कांपरें दुपटीनें सुटावयाला लागतें. ते या भूलोकींचें केवळ कृतांत आहेत.

शरच्चंद्र : सरोजिनी, पुन्हां एकदां विचार कर. जोंपर्यंत विचाराला वेळ आहे तोंपर्यंत त्याचा उपयोग करून घे. विक्रांत राजाचा महाप्रताप आणि ऐश्वर्य लक्षांत आण. उलटपक्षीं त्या मुक्याचें लघुत्व मनांत आणून त्याला हृदयांतून काढून टाक.

सरोजिनी : दादा, माझ्या निश्चयांत आतां काडीचाहि बदल होणार नाहीं.

रोहिणी : तर मग याला उपायच नाहीं म्हणायचा—?

शरच्चंद्र : वकीलसाहेब, याला एखादी तोड तुम्हांला काढतां येणार नाहीं का ?

सरोजिनी : मी तुमची धर्मकन्या आहे असें, वकीलसाहेब, समजा. कां ? मान कां हलवतां ? एवढाहि प्रसाद तुमच्यानें करवत नाहीं ना ?—बरें तर दादा मी सुचवित असलेल्या दुसऱ्या एका तरी मार्गाला आपली संमति दे !

शरच्चंद्र : कोणत्या ?

सरोजिनी : आत्महत्त्येच्या !

प्रतिनिधि : काय आत्महत्त्या ?

सरोजिनी : होय आत्महत्त्याच ! तोच एक आतां केवळ मार्ग यांतून सुटायला उरतो ! दादाच्या, वहिनीच्या आणि राजाच्या हिताकरितां मीच या जगांतून नाहींशी होणें इष्ट आहे !

प्रतिनिधि : शिव शिव ! काय हा अघोरी मार्ग !

रोहिणी : प्रतिनिधिसाहेब, मी एक याहून अत्यंत सोपा उपाय सुचवूं का ?

प्रतिनिधि : सुचवा पाहूं !

रोहिणी : पण आपण रागावणार तर नाहीं ?

प्रतिनिधि : छेः, ती शंकासुद्धां नको आपल्या मनांत !

रोहिणी : आपण आपली तेवढी दाढी आणि फेटा जरा काढून ठेवा पाहूं !

सरोजिनी : वहिनी, काय ही भलतीसलती थट्टा—?

प्रतिनिधि : पण माझ्या बहिणीनें असली थट्टा करावयाची नाहीं तर कुणी ?

सरोजिनी : तुमची बहीण ? वाः तुम्हीहि बरेच थट्टेखोर दिसतां कीं !

प्रतिनिधि : आमच्या राजेसाहेबांच्या मानानें कांहींच नाहीं !

असें म्हणून त्या वृद्ध प्रतिनिधीनें खरोखरच आपला फेटा व दाढीमिशा दूर केल्या. त्या दूर करितांच सरोजिनीच्या तोंडांतून एकदम आश्चर्योद्गार बाहेर पडले, " अगबाई, हे तर वीणारव ! "

रोहिणी : म्हणजेच माझा भाऊ विक्रांत !

सरोजिनी : मी स्वप्नांत तर नाहीं ना ?

वेत्रिका : खात्री पटविण्याकरितां चांगला चिमटा घेऊं का ?

रोहिणी : अंहं—तूं नको बाई करूंस तें—!

वेत्रिका : कां ?

रोहिणी : तें काम करायला कायापालट झालेले हे बुद्धे मूकनायकच तिला अधिक पसंत असतील !

सरोजिनीनें सरोष नजरेनें विक्रांताकडे पाहिलें. विक्रांतानें खांदे उडवीत व हातवारे करीत आपल्याला बोलतां येत नसल्याचा अभिनय करून दाखविला !



## प्रकरण....५ वें

★ ★

मराठी रंगभूमीच्या पहिल्या सुमारें साठ वर्षांच्या कारकीर्दींत ( इ. स. १८४३ ते १९०० ) मुख्यत्वेंकरून पौराणिक, अद्‌भुत व सामाजिक कथानकें असलेलींच नाटकें होत असत. परंतु एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभापासून देशांतील राजकीय आंदोलनें जसजशीं वाढूं लागलीं तसतशीं नाट्यसृष्टींतील या प्रकारचीं नाटकें मागें पडून त्यांची जागा ज्यांना कांहीं राजकीय तत्त्वज्ञानाची बैठक किंवा प्रचाराची भूमिका आहे अशीं नाटकें घेऊं लागलीं.

देशांतील राजकीय असंतोष एक तपाहून अधिक काळ धुमसत होता. इंग्रज सरकारनें इ. स. १८८५ पासून दरसाल सुमारें ९ कोटी रुपये उत्पन्न अधिक येईल अशा मानानें कर वाढविले. सरकारजवळची शिलकी रक्कम दरवर्षी कोटींनीं फुगत असतांहि सरकार कराचा भार कमी करीत नव्हतें. हिंदुस्थानांतील रुपयाचा भाव इंग्लंडमधील शिलिंगाच्या किंमतीवर अवलंबून असतो. सरकारनें याच सुमारास रुपयाचा भाव १ शि. २ पेन्सांवरून १ शि. ४ पेन्सांवर नेल्यामुळें--म्हणजेच हुंडावणाळीच्या भावांत चढ केल्यामुळें शेतकऱ्यांचें दरसाल सुमारें आठ कोटींचें नुकसान व सरकारी तिजोरीचा तितकाच फायदा होऊं लागला. १८७७ ते १९०० या कालखंडांत एकूण सहा सात वेळां पडलेल्या दुष्काळानें व नवीनच उद्भवलेल्या प्लेगच्या सांथीनें सुमारें दोन कोटी माणसें मृत्युमुखीं पडलीं. १८९६ सालीं सरकारनें विलायतेंतून इकडे येणाऱ्या कापडावर पूर्वीं जी शेंकडा पांच टक्के जकात होती ती शेंकडा साडेतीन केली व विलायतेंतून येणाऱ्या सुतावरची जकात तर अजिबात काढूनच टाकिली. परदेशांतील मालाला हिंदुस्थानाची बाजारपेठ जास्त जास्त फायद्याची व सवलतीची होण्याच्या बुद्धीनें हें सारें केलें जात आहे हें न कळण्याएवढी त्या वेळची हिंदी जनता दुधखुळी राहिलेली नव्हती. असें सर्व बाजूंनीं असंतोषाचें वातावरण असतांना १८९९ सालीं लॉर्ड कर्झन हे हिंदुस्थानामध्यें व्हॉइसरॉय म्हणून कलकत्त्यांत ( हिंदुस्थानाच्या त्यावेळच्या राजधानींत ) येऊन दाखल झाले. त्यांनीं "आपल्या हातीं राज-

सत्ता घेतल्यापासून युनिव्हर्सिट्यांच्या सीनेटमधील सरकारनियुक्त सभासदांची संख्या वाढव, कलकत्ता कॉर्पोरेशनमधील सरकारनियुक्त सभासद अधिक कर, प्रांतिक गव्हर्नरांचे व प्रांतिक सरकारांचे अधिकार कमी करून त्यांच्यावर देखरेख करणारे हिंदुस्थान सरकारचे अधिकारी वाढव, प्रांतिक अधिकारी वर्गात भरणा करितांना चढाओढींच्या परीक्षांचें तत्त्व मागें टाकून सरकारनियुक्ततेचें धोरण स्वीकार, वगैरे अनेक गोष्टी करून हिंदुस्थानांतील राज्यकारभार सर्वतोपरी अनियंत्रित आणि एकतंत्री करण्याचें व नंतर त्याच्या जोरावर अफगाणिस्तान, तिबेट, रशिया, चीन वगैरेंना शह देण्याचें त्यांचें धोरण होतें. अनियंत्रित सत्तेचें केंद्रीकरण आणि आक्रमणशील परराष्ट्रीय धोरण, यांच्यापुढें हिंदी पुढाऱ्यांच्या वाढत्या लोकसत्ताक आकांक्षांना मुळींच अवकाश नव्हता." (शं. द. जावडेकरकृत 'आधुनिक भारत' पृ. २७२–७३) या साऱ्या अन्यायांवर अगदीं कळस चढविणारी अशी एक गोष्ट लॉर्ड कर्झन यांनीं १९०५ सालीं केली. लोकमताला कोठल्याहि प्रकारें न विचारितां त्यांनीं गुप्तपणें लॉर्ड मोर्ले यांच्याशीं पत्रव्यवहार करून बंगाल प्रांताची फाळणी करून 'पूर्व बंगाल' या नांवाचा एक नवा प्रांत करण्याची परवानगी मिळविली. "ता. २० जुलै १९०५ रोजीं बंगालची फाळणी प्रथम जाहीर करण्यांत आली व कोणाच्याहि अदमासाबाहेर झालेली बंगाल प्रांताची ही छिन्नविछिन्नता पाहून कपाळावर हातोडा मारावा त्याप्रमाणें बंगालचे लोक चकित व स्तंभित झाले. त्यांनीं तावडतोब ही फाळणी रद्द करण्याचा विचार केला. राज्यकारभाराच्या सोयीकरतां ही विभागणी केली नसून बंगाली राष्ट्राची मानखंडना करण्याचा व त्याला दुर्बल करण्याचा तिच्या मुळाशीं हेतु होता अशी लोकांची भावना झाली......'वंगभंगाची चळवळ' म्हणून ही चळवळ प्रसिद्ध आहे...या चळवळीमुळें देशांत राष्ट्रीय भावनेचा जो पर्जन्य पडला त्याला अनंत झरे फुटले व झऱ्यांच्या रीतीप्रमाणें ते अनेक दिशांनीं व अनपेक्षित रीतीनें फुटलें. वर्तमानपत्रकर्ते धीट, साहसी व चमत्कृतिपूर्ण लेख लिहिण्यास शिकले. आळशी बुद्धिवान लिहूं लागले, कवींची दिव्य प्रतिभा स्फुरूं लागली. भाषा-अलंकाराचा सुंदर बाजार सजला. व्याजोक्ति, वक्रोक्ति

वगैरे निंदा-निषेधाचे जितके सूक्ष्म व नाजूक प्रकार तितके लेखांत व भाषणांत नटूं लागले. कल्पनात्मक बुद्धीच्या लोकांना नवीं कथानकें व कपोलकल्पित गोष्टी सुचूं लागल्या......" [ न. चिं. केळकरकृत 'लो. टिळक यांचं चरित्र'— खंड २, भाग ४ पृष्ठें—४६ ते ५३ ]



जन्म

१८७२

कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर

या अशा विशिष्ट परिस्थितींतच नाटकांतील पौराणिक कथानकामागें कांहीं राजकीय रूपक अभिप्रेत धरून नाटकें लिहिण्याच्या कल्पनेचा उगम झाला.

सामाजिक नाटकांच्या वाढत्या प्रसारामुळें पौराणिक नाटकांना जी उतरती कळा लागली होती ती या कल्पनेमुळें सांवरली गेली. अशा प्रकारचीं राजकीय रूपक असलेलीं कांहीं निवडक पौराणिक नाटकें म्हणजे 'कीचकवध' (१९०७) 'भाऊबंदकी' (१९०९) व 'मेनका' ( १९२६ तिन्ही कृ. प्र. खाडिलकर ), 'संगीत औदार्याचा डंका', (कृ. है. दीक्षित १९२२ ), 'सं. मथुरा' ( आ. कृ. टेकाडे १९२२ ), 'सं. पटवर्धन' (गो. स. टेंबे १९२४ ), 'सं. अहंकार' (भी. खं. कोरान्ने १९२५) 'सं. देवकी' (वि. वा. हडप १९३२ ) हीं होत.

वर उल्लेखिलेल्या नाटकांतच केवळ नव्हे तर एकंदर मराठी नाट्यसृष्टींत कृ. प्र. खाडिलकरांच्या 'कीचकवधा'चा क्रम फार वरती लागतो. खाडिलकरांनीं ऐतिहासिक, पौराणिक व कल्पनारम्य अशीं सर्व तऱ्हेचीं मिळून एकूण १४ नाटकें लिहिलीं आहेत.

**ऐतिहासिकः**—'सवाई माधवराव यांचा मृत्यु' (१८९३), 'कांचनगडची मोहना' (१८९८), 'भाऊबंदकी' (१९०९).

**अद्भुतरम्यः**—'प्रेमध्वज' (१९१०), 'मानापमान' (१९११).

**पौराणिकः**—'कीचकवध' (१९०७), 'बायकांचें बंड' (१९०९), 'विद्याहरण' (१९१३), 'सत्त्वपरीक्षा' (१९१४), 'स्वयंवर' (१९१६), 'द्रौपदी' (१९२०), 'मेनका' (१९२६), 'सवतीमत्सर' (१९२७), 'सावित्री' (१९३०).

महाभारताच्या विराटपर्वांत कीचकवधाची जी कथा आलेली आहे तिच्या आधारें श्री. खाडिलकरांनीं आपलें 'कीचकवध' हें नाटक रचिलें आहे. ह्या नाटकाचा प्रयोग पहात असतांना त्यांतील विराट म्हणजे ब्रिटिश साम्राज्याचा राजा, कीचक म्हणजे व्हॉइसरॉय लॉर्ड कर्झन, सैरंध्री म्हणजे हिंदुस्थान, युधिष्ठिर म्हणजे मवाळ पक्ष व भीम म्हणजे जहाल पक्ष हें तत्कालीन प्रेक्षकांच्या ताबडतोब ध्यानात येत असे. नाटकांतील या ध्वनित अर्थामुळेंच १९१० ते १९२६ या कालखंडांत आक्षिप्त वाङ्मय म्हणून 'कीचकवध' नाटक जप्त करण्यांत आलें होतें.

'कीचकवधा'चा पहिला प्रयोग ता. २२ फेब्रुवारी १९०७ रोजीं पुणें येथील 'विजयानंद थिएटरां'त महाराष्ट्र नाटक मंडळीनें करून दाखविला. हें नाटक गोष्ट रूपानें पुढें दिलें आहे.

# कीचकवध

नाटककार

**कृष्णाजी प्रभाकर खाडीलकर**

" महाराज, आपण शांतिब्रह्माचे सागर आहां, तेव्हां जुलूम करणाऱ्यांच्या लाथा सर्वांनीं शांतपणें खाव्या, असें आपणांस वाटतें तें ठीकच आहे. आपणांस राजसभेंत बसावयास मिळतें, केवळ धर्माधर्माच्या वादविवादांत राजा आपली सल्लामसलत विचारून जुगाराचे दोन पैसे तोंडावर फेंकतो, एवढ्यावरच संतुष्ट होऊन इंद्रप्रस्थाच्या सिंहासनाच्या मालकांनीं खुद्द आपल्या बायकोला परक्याची वाईट रीतीनें दासी होण्यास सांगावें, ह्याहून पांडवांना लज्जास्पद गोष्ट कोणची ?— गुलामगिरींत कांहीं दिवस गेल्यानें गुलामगिरींतच मजा वाटूं लागते, ह्याचें उदाहरण म्हणून, विराट नगरींतील पांडवांच्या वर्तनाकडे आपल्या पुत्रपौत्रांनीं बोटें दाखवूं नयेत असें तरी आपण वागलें पाहिजे ! "

दासीवेषांतील द्रौपदी भिक्षुवेषधारी धर्माला उद्देशून बोलत होती. विराट नगरींत किंचित् आडबाजूच्या एका महालक्ष्मीचे देवालयांत त्यांचें संभाषण चाललें होतें. तिन्हीसांजाची वेळ टळून गेली होती; देवळांतला राबता बराच कमी झाला होता. देवालयामागच्या प्रदक्षिणेच्या वाटेवर उभें राहून अगदीं हलक्या आवाजांत त्यांचें बोलणें चाललें होतें. आपल्याकडे कोणाचें लक्ष आहे कीं काय हें पहाण्याकरितां त्यांच्या नजरा अधूनमधून चारी दिशांनीं भिरभिरत होत्या. स्वतःबद्दल इतकी दक्षता घेणें त्यांना अगदीं अपरिहार्य होतें.

पांडवांची वनवासाची मुदत संपल्यानंतर दुर्योधनाशीं ठरलेल्या करारा-प्रमाणें त्यांना एक वर्ष अज्ञातवासांत काढणें भाग होतें. विचारान्तीं त्यांनीं अज्ञात-वासाचे दिवस काढण्याकरितां मत्स्य देश पसंत केला. मत्स्य देशच पसंत करण्याचें

कारण म्हणजे तेथील राजा विराट हा पांडवांचा पक्षपाती होता शिवाय पांडवांना ओळखणारीं माणसेंहि तेथें फारशी असण्याचा संभव नव्हता. तरीहि उगीच धोका नको म्हणून पांडवांनीं तेथें जातांना इतकें बेमालूम वेषांतर केलें होतें कीं खुद्द राजा विराट किंवा त्याची पत्नी सुदेष्णा यांपैकीं कोणीहि त्यांना ओळखूं शकलें नाहीं. द्रौपदी दासीवेषानें राजवाड्यांत, भीम आचाऱ्याच्या भूमिकेंत राजवाड्यांतील मुदपाकखान्यांत व धर्म भिक्षूच्या वेषांत विराटाच्या दरबारांत राहिला होता. सैरंध्री, बल्लव व कंकभट अशीं नांवें अनुक्रमें त्यांनीं धारण केलीं होतीं. परंतु इतकी सर्व काळजी घेऊनहि शेवटीं इथेंहि त्यांचें दुर्दैव आड आलेंच. स्वतः राजा विराट अत्यंत धर्मशील, उदार व सद्वर्तनी असला तरी सेनापति कीचक हा अत्यंत पाखंडी, अरेरावी व दुर्वर्तनी असल्यानें देशांत सर्वत्र अनास्था माजली होती. चोहींकडे अनीतीचें वातावरण पसरलें होतें. मत्स्य देशाशीं पिढ्यान्-पिढ्यांचें वैर असलेल्या शेजारील त्रिगर्ताच्या सुशर्मा राजानें केलेले कित्येक हल्ले केवळ कीचकाचें युद्धकौशल्य व त्यानें तयार केलेलें प्रबळ सैन्य यांच्या जोरावरच राजा विराटाला परतवून लावितां आले होते. शिवाय राणी सुदेष्णा ही कीचकाला तो केवळ एक ' सूतपुत्र ' असूनहि आपला बंधू म्हणून मानी. या दोन्ही कारणांमुळें राजा विराटाला कीचकाच्या दुर्वर्तनाकडे दुर्लक्ष करणें भाग पडे. कीचक हस्तिनापूरहून आल्यापासून तर भलताच बेफाम व उद्दाम झाला होता. कारण तेथें तो गेलेला असतांना कौरवेश्वर दुर्योधन ह्यानें त्याचा कमालीचा आदरसत्कार करून त्याला पांडवांच्या विरुद्ध अतिशय चिथवून ठेविलें होतें. पांडवांना अनुकूल असलेल्या राजा विराटाला कीचकामार्फत शह देण्याचा दुर्योधनाचा डाव यांत अर्थात अगदीं उघड होता. भरदरबारांत त्यानें कीचकाची अगदीं मुक्त कंठानें स्तुति करून त्याला एक उंची भरजरी पोषाख अर्पण करून ' मत्स्य देशाचा महाराज ' या पदवीनें गौरविलें. याशिवाय पांडवांबद्दल त्याच्या मनांत क्षुद्रभाव निर्माण व्हावा या हेतूनें युधिष्ठिराचें छत्रहि त्यास अर्पण केलें. या गौरवामुळें कीचक इतका चढून गेला कीं त्या भरांत कौरवांच्या दरबारांत त्यानें पुढीलप्रमाणें वल्गना केली; : "मी प्रतिज्ञा करून असें सांगतों कीं,

थोड्या दिवसांनीं कौरव-पांडवांच्या युद्धाची वेळ आली म्हणजे, भीष्म, द्रोण किंवा कर्ण, ह्यांच्या हातूनहि न होणारा पराक्रम मी करून दाखवीन. माझ्या गदेनें भीमाचे शतशः तुकडे झाल्यावर, माझ्या बाणांनीं अर्जुन गतप्राण झाल्या-वर, युधिष्ठिराच्या शेंडीला पकडून, मी माझ्या पायांवर त्याला डोकें ठेवावयास लावून, त्याला जीवदान देईन, व त्याला गरीब भिक्षुकाचा पोषाख घालून अरण्यांत तपश्चर्या करण्यास पाठवून देईन. नकुल-सहदेव या नटव्या जोडीनें बायकांचा पोषाख करून, माझ्यावर चामरें उडविण्याचें कबूल केलें तरच त्यांना जिवंत ठेवीन." ही वल्गना त्यानें करतांच तावडतोब दुर्योधनानें जाहीर केलें कीं, "मत्स्य देशाचे महाराज कीचक यांना त्यांनीं आतां सांगितलेला दिव्य पराक्रम करून दाखवितांच तत्काळ इंद्रप्रस्थाचें राज्य व द्रौपदी अर्पण करण्यांत येईल." येवढें जाहीर करूनच केवळ दुर्योधन थांबला नाहीं तर कीचकाला आपल्या प्रतिज्ञेची आठवण नेहमीं रहावी म्हणून त्याच्या पायांतील डाव्या चढावावर 'भीम' व उजव्या चढावावर 'अर्जुन' अशीं अक्षरें लिहून ठेविलीं व द्रुपद राजानें 'द्रौपदीपति' हीं पंचाक्षरें हिऱ्यांवर कोरून ज्या पांच आंगठ्या पांडवांना नजर केल्या होत्या त्याहि कीचकास अर्पण केल्या. ज्या पांच आंगठ्या, दुर्योधनानें जातीनें त्याच्या बोटांत घालतांच भरदरबारांत शंभर कौरवांनीं "द्रौपदीपति कीचक महाराज की जय!" असा जयजयकार उच्चस्वरांत करून आपला आनंद व्यक्त केला! कौरवांच्या दरबारीं झालेल्या ह्या बेसुमार गौरवामुळें कीचकाला अगदीं अस्मान ठेंगणें वाटूं लागलें. आधींच असलेला अंगचा अहंकार व उन्माद आतां अगदीं अमर्याद झाला. त्याच्या अनाचारांना आतां पारावर उरला नाहीं. एके दिवशीं राणी सुदेष्णेच्या पदरीं असलेली सैरंध्री नांवाची एक सुंदर दासी त्याच्या दृष्टीस पडली. तावडतोब कसलीहि लाजलज्जा, भीडभीड न ठेवितां त्यानें त्या दासीला आपल्याकडे पाठविण्या-बद्दल राणी सुदेष्णेजवळ मागणी केली. सैरंध्री विवाहित होती. कीचकाच्या पदरीं राहण्यास ती मुळीच तयार नव्हती. अशा स्थितींत त्या पतिव्रतेला जुलमानें कीचकाकडे पाठविणें सुदेष्णेच्या जीवावर आलें. कीचकाला ही बातमी कळतांच

त्यानें प्रधानामार्फत राणीला निरोप पाठविला कीं, "सैरंध्रीला आपण जर आपण होऊन पाठवून दिली नाहीं, तर अधिराजांचा उघड अपमान करून व एकेरीनें बोलून, सर्वांदेखत सैरंध्रीला नेण्याचा माझा विचार निश्चित ठरला आहे."

अशा चमत्कारिक परिस्थितींत मदतीसाठीं कंकभटाकडे धांवण्यावांचून सैरंध्रीला गत्यंतर नव्हतें. तिनें गुपचूपपणें कंकभटाला महालक्ष्मीचे देवालयांत गांठलें व त्याच्या कानावर सारी हकिगत घातली. परंतु त्या तशा स्थितींतहि कंकभट जेव्हां नेहमींप्रमाणें तिला 'शांत राहण्याचा' व 'संयम न सोडण्याचा' उपदेश करूं लागला तेव्हां सैरंध्री अगदीं खवळून गेली व तिच्या तोंडांतून प्रस्तुत कथारंभीं दिलेले उद्गार त्वेषाच्या भरांत बाहेर पडले. पण कंकभटाच्या थंड प्रकृतीवर त्याचा कांहींहि परिणाम झाला नाहीं. तो तिला शांतपणें म्हणाला, "द्रौपदी, शाब्दिक अपमान सांप्रतच्या स्थितींत आपण मुकाट्यानेंच गिळले पाहिजेत. पण तो दुष्ट कीचक आपल्या शब्दाप्रमाणें खरोखरच वागण्यास जर प्रवृत्त होऊं लागला तर सुदेष्णेचीं आर्जवें कर, वेळच आली तर तिच्या पायांहि पड. महाराणीच्या सत्यनिष्ठेवर व औदार्यावर अवलंबून रहा म्हणजे कीचकापासून तुला त्रास होणार नाहीं." सैरंध्रीला त्याचा तो शांतिपाठ इतका असह्य झाला कीं तत्क्षणीं ती तेथून ताडकन् निघून गेली. ती गेलेल्या दिशेकडे खिन्न मुद्रेनें पाहात कंकभट बराच वेळ तेथें उभा होता. शेवटीं जड पावलांनीं तो लक्ष्मीच्या मूर्तीजवळ जाऊन उभा राहिला व हात जोडून भक्तिभावानें तिला म्हणाला, "देवी, पूर्वीं कौरवांच्या दरबारांत जेव्हां अवघड प्रसंग निर्माण झाला होता त्या वेळीं आंधळ्या धृतराष्ट्राच्या मनांत सद्बुद्धि उत्पन्न करून ज्याप्रमाणें पांडवांची अब्रू वांचविलीस, त्याचप्रमाणें आतांहि राजा विराट व राणी सुदेष्णा ह्यांना सुबुद्धि देऊन पांडवांना सांप्रतच्या प्रसंगांतून पार पाडून ने."

परंतु देवीनें कंकभटाच्या विनंतीकडे बिलकूल लक्ष दिलेलें नसावें; कारण दिवसेंदिवस सैरंध्रीच्या वाढत्या विरोधाबरोबर तिला आपल्या नाटकशाळेंत खेंचण्याचा कीचकाचा दुराग्रहहि वाढतच गेला. एके दिवशीं तर या बाबतींत राजा विराटाला

व राणी सुदेष्णेला चार मंडळींत धमकी देण्यासहि त्यानें कमी केलें नाहीं. तो प्रकार असा झाला. राजवाड्यांत कीचक व त्याची पत्नी रत्नप्रभा ह्यांस साखरपाण्यास बोलविण्यांत आलें होतें. पंक्तीला कंकभट व राजाचा एक विनोदी स्वभावाचा आश्रित मैत्रेय हेहि हजर होते. वाढावयास बल्लव आचारी व त्याच्या मदतीला सौदामिनी नांवाची एक दासी अशीं दोघें होतीं. सगळी वाढावाढ झाल्यावर राणी सुदेष्णा विराटाला उद्देशून म्हणाली, "सर्व वाढून झालें—दादाला बसावयास सांगावयाचें होतें."

विराट : बसायचें कीचकमहाराज.

सुदेष्णा : मैत्रेयभटजी, हं, आरंभ करा !

मैत्रेय : कंकभट, हं, पहातां काय ?

सुदेष्णा : आतां वाट कोणाची पहावयाची ?—बसायचें होतें दादा.

विराट : आरंभ करावयाचा महाराज.

कीचक : पण ती कोठें आहे ? मघांपासून तुला अक्का सांगतों आहें कीं तिच्या. शिवाय आपण एका पदार्थालाहि हात नाहीं लावणार...ती येऊं दे मग बसूं. तोंपर्यंत बसत नाहीं.

सुदेष्णा : रत्नप्रभा राणीसाहेब तर तुझ्याजवळच उभ्या आहेत कीं ! अगदी त्यांच्याशिवाय घांसहि खालीं उतरत नाहीं हो ?

विराट : नवराबायकोचें प्रेम असावें तर असेंच असावें !

कीचक : अधिराज विराटमहाराज,—सुदेष्णाराणीसाहेब,—मी कोणत्या अटीवर आपणाकडे साखरपाण्यास येण्याचें कबूल केलें तें आठवतेंना ? मी पाटावर पाय ठेवल्यापासून सैरंध्री माझी होईल, मेजवानीचे वेळीं माझ्या सेवेला माझी दासी म्हणून ती तत्पर राहील व साखरपाण्याहून परत जातांना ती माझ्याबरोबर दिली जाईल, असें वचन आपण आमंत्रणाचे वेळीं दिल्याचें स्मरतेंना ?

सुदेष्णा : होय, वचन दिलें होतें, आणि फराळ झाल्यावर सैरंध्रीला मी आपल्या हवालींहि करणार आहें.

कीचक : फराळ झाल्यावर ? पाटावर पाय ठेवल्याबरोबर सैरंध्री माझ्या सेवेला

हजर राहील म्हणून काल वचन, आणि आज येथें येऊन बसलों तों, हा धटिं-गण बलव वाढायला आमच्यापुढें उभा!—जा, असल्या धटिंगणानें वाढलेले पदार्थ आम्हीं खात नसतों." (असें म्हणून कीचकानें आपल्यासमोरचें ताट पायानें दूर ढकलून दिलें.)

विराट : असें काय कीचकमहाराज ? तिच्या हातून जर कांहीं अपराध झाला असला, तर फराळानंतर आपण त्याचा अवश्य विचार करूं.

मैत्रेय : वाढलेलें अन्न लोटून देऊं नये.

कंकभट : अन्नं ब्रह्मेति व्यजानात्। अन्नाचा शाप बाधल्याशिवाय रहात नाहीं.

कीचक : गप्प बसा भटुर्यांनो, तुमचा जन्म अन्नाकरतां आहे; आणि अन्नच काय जगांतील सुखोपभोगाचे सर्व पदार्थ मजकरितां आहेत. सुदेष्णाराणीसाहेब, चुकून मी आपणांस बहीण म्हणून जें म्हटलें तें सदोदितचें खरें व्हावें म्हणून, मी त्रिगर्तांचा पराभव केला व मत्स्य देशाच्या सिंहासनाचें पुनरुज्जीवन केलें. या विजयाची आठवण ताजी होती, त्या वेळीं मला काय आवडेल याचा अंदाज बांधून, माझा शब्द— उत्पन्न होण्याच्या अगोदरच—झेलला जात असे. मी आठ-दहा महिनेच काय तो मत्स्य देशांत नव्हतों, एवढ्या अवकाशांत माझ्या शब्दाची किंमत इतकी कमी झाली हं ! एक यःकश्चित् दासी मी मागावी, आणि तिला द्यायला तुमच्या जिवावर यावें; फार चांगली कृतज्ञता, फार चांगली कृतज्ञता !

विराट : सैरंध्री कीं कोण दासी ती,—कीचकमहाराजांच्या त्या आवडत्या दासीला हांक मारा पाहूं आधीं. क्षुल्लक गोष्टींकरतां कसलीं रणें माजवितां आहांत ?

बलव : ती स्वयंपाकगृहांत कामांत गुंतली आहे.

सुदेष्णा : सौदामिनी, तूं जा तिच्या जागीं; आणि तिला इकडे पाठवून दे.

सौदामिनी : मी तिकडेच जात होतें, पण बलभ जाऊं देईना !

मैत्रेय : कायरे वेड्या बलवा, तुलारे काय ?. हाताखालीं खटपटीला सौदामिनी काय नि सैरंध्री काय ?

कंकभट : जरा हुषार माणूस हाताखालीं असलें म्हणजे पाकसिद्धि चांगली होते.

सुदेष्णा : पण इतर कितीतरी चाकर माणसें आहेत कीं त्याच्या हाताखालीं !

बल्लव, दे प्राइं आधीं सैरंध्रीला पाठवून.—पण तसें नकोच ! मीच स्वतः जाऊन तिला घेऊन येतें ! ”

नंतर सुदेष्णा राणी आंत गेली. मंडळी जेथें बसली होती त्या भोजन-गृहाला लागून असलेल्या खोलींतच सैरंध्री बाहेर पाठवावयाच्या साहित्याची जुळवा-जुळव करीत बसलेली होती; त्यामुळें राणीचें व तिचें बोलणें बाहेर स्पष्टपणें ऐकूं येत होतें. सुदेष्णा राणी तिला बाहेर चलण्याचा आग्रह करीत होती व ती शक्यतों अदबीनें आपला नकार व्यक्त करीत होती. सुदेष्णा जेव्हां फारच आग्रह करूं लागली तेव्हां अर्धवट काकुळतीनें व अर्धवट वैतागानें ती म्हणाली, “ बाईसाहेब, मी पायां पडतें, पदर पसरून भीक मागतें, ह्या दुष्ट लांडग्याच्या जुलमांतून ह्या गरीब गाईला कसेंहि करून सोडवा हो. ” भावनाविवशतेमुळें सैरंध्रीचा आवाज बराच उंचावला होता व त्यामुळेंच तिनें उच्चारलेलें हें शेवटचें वाक्य बाहेरील मंडळींना अगदीं स्पच्छपणें ऐकूं आलें. तामसी प्रकृतीच्या कीचकाला हें वाक्य डोक्यांत राख घालण्यास पुरेसें झालें. तो ताडकन् आपल्या जागेवरून उठला व विराटाला उद्देशून म्हणाला, “ विराटमहाराज, आतां मला तुमचें कारस्थान समजलें ! सैरंध्रीला प्रथम दूर पाठवून सर्वांदेखत माझा अपमान करावयाचा, आणि पुन्हां त्या दासीकडून माझ्या तोंडावर दुष्ट लांडगा, अशी मला शिवी देऊन सर्व नोकरांच्या दृष्टीनें मला कःपदार्थ करून सोडायचें एवढ्याकरितां हा मेजवानीचा थाट हं ! बस्स, आम्ही येथून आतां चाललों. पण जाण्यापूर्वीं विराट राजा, मी केलेले उपकार व माझें सामर्थ्य ह्याचें विस्मरण होऊं देऊं नकोस येवढेंच तुला बजावीत आहें. मी माझ्या बाहुबलानें तुझें डळमळणारें सिंहासन जर स्थिर केलें नसतें, तर तुझी ही राणी सुदेष्णा त्रिगर्तांच्या सैन्यांतील एखाद्या क्षुल्लक सारथ्याच्या नाटकशाळेंत आज नाचत राहिली असती याची तुला जाणीव आहे ना ? राजा, पांडवांची राणी द्रौपदी हिला आपली नाटकशाळा बनविण्याची ज्याची प्रतिज्ञा, त्याच्यापुढें तुझ्या मंदिरांतील एका यःकिंचित् दासीनें ‘ नाहीं ’ असें उत्तर दिलें असतां, त्याचे काय भयंकर परिणाम होतील; ह्याचा नीट विचार केला आहेस ना ? बस्स.

आतां मी येथून जातों, आणि चार दिवसांचे आंत सैरंध्री जर माझ्या नाट्य-शाळेंत रहावयास आली नाहीं,—तर हा आजचा अपमान—मी बोलून दाखवीत नाहीं अधिक—पण नीट विचार करून काय करावयाचें तें कर येवढेंच तुला सध्यां बजावतों ! " असे उद्गार काढून, विराटाचें कांहींहि म्हणणें ऐकून न घेतां कीचकाची स्वारी दाणदाण पाय आपटीत राजवाड्याबाहेर पडली. राजा विराटहि मैत्रेयाला घेऊन कीचकाच्या मंदिराकडे त्याची समजूत पाडण्याकरितां म्हणून त्याच्या मागोमाग वाड्याबाहेर पडला.

कीचक रागावून निघून गेल्याचें सुदेष्णेला जेव्हां कळलें तेव्हां तिच्या मनाचा सारा संयम सुटला व ती सैरंध्रीला म्हणाली, "सैरंध्री, अग तूं यःकिंचित् दासी, आणि तुझ्यामुळें कीचकमहाराजांचा अपमान होऊन त्यांनीं येथून रुसून जावें हें तुला शोभतें का ? रत्नप्रभावहिनी, पाहिलंतना ह्या दासी किती मस्तवाल झाल्या आहेत तें. तें कांहीं नाहीं, सैरंध्री जा, ह्या पावलीं कीचकमहाराजांच्या मंदिराकडे जा, त्यांच्या पायां पड, त्यांच्यापुढें नाक घास,—

सैरंध्री : बाईसाहेब, आपणच माझ्यावर अशा रागावलां, तेव्हां मजवर परमेश्वरच कोपला आहे, असें म्हटलें पाहिजे. सद्गुणांबद्दलची आपली आवड, धर्मावरची आपली श्रद्धा, आणि अनाथांबद्दलचा आपला कळवळा, हीं ऐकून मी माझ्या आपत्तीच्या वेळीं आपल्या सांवलीला रहावयाला आलें. माझ्या पतींना मी अप्रिय होईन अशी कोणतीच सेवा मी करणार नाहीं, आणि कोणत्याहि पुरु-षाची दासी होणार नाहीं, अशी मी चाकरीला राहिलें त्यावेळीं आपल्या पायां-पाशीं विनंति केली होती, आणि आपणहि पाठच्या बहिणीप्रमाणें माझ्या अब्रूचें रक्षण करीन म्हणून मला वचन दिलें होतें.

सुदेष्णा : रत्नप्रभावहिनी, मला आतां या प्रसंगीं मी कसं वागावें हेंच समजेनासें झालें आहे. पण सैरंध्री, तुला अगदीं खरं सांगूं का, या सर्व प्रकरणाला आतां कीं नाहीं राजकाजाचें स्वरूप येऊं पहात आहे; आणि राजकाजाचा प्रश्न उद्भवला, म्हणजे सद्गुणांना कर्ते पुरुष किंमत देत नाहींत, हें तुला माहीतच आहे.

कंकभट : राजकाज व धर्मनीति ह्या जोडीनें, हातांत हात घालूनच चालले

पाहिजे; राजकाजानें धर्मबुद्धीची पायमल्ली करतां कामा नये.

सुदेष्णा : कंकभट, मला ह्या सर्व गोष्टी कळतात, पण—

रत्नप्रभा : महाराणीसाहेब, हिची धर्मबुद्धि पाहून मला कीं नाहीं ही खरोखरी माझ्या बहिणीसारखी वाटते.—सैरंध्री, तूं उगीच आतां शोक करूं नकोस.—राणीसाहेब, चार दिवसांची अवधि तिकडून देण्यांत आली आहे, तेवढ्या अवकाशांत मी मुळीं तिकडचें मनच बदलून टाकतें, मग तर झालें ना ?

सुदेष्णा : रत्नप्रभावहिनी, आपणच मनावर घेतल्यावर काय नाहीं होणार ?

रत्नप्रभा जेव्हां घरीं जावयास निघाली तेव्हां राणी सुदेष्णेनें मोठ्या प्रसन्न चित्तानें तिला निरोप दिला. आणि सैरंध्रीनें दारांतूनच अशा कांहीं दृष्टीनें रत्नप्रभेकडे पाहिलें कीं त्या द्वारां तिच्या चित्तांतील सारे भाव निमिषार्धात तिच्या लक्षांत आले.

परंतु द्रौपदीच्या दुर्दैवानें रत्नप्रभेच्या प्रयत्नांना यश आलें नाहीं. उलट कीचकानें आपल्या अनुयायांना अशी गुप्त आज्ञा दिली कीं सैरंध्री जेथें सांपडेल तेथून तिला पळवून आणावी. त्याप्रमाणें त्याचे अनुचर सर्वत्र गुप्तपणें वावरत होते. नृत्यशाळा, चित्रशाळा, संगीतशाळा, पाकशाळा—जेथें जेथें म्हणून ती असण्याची शक्यता होती तेथें तेथें तिच्या शोधार्थ ते हिंडत होते. राजा विराटाला ही बातमी कळल्यावांचून राहिली नाहीं. मात्र ही बातमी कळल्यापासून तो जरा चिडल्यासारखाच झाला. कारण या बाबतींत त्यानें स्वतः, राणी सुदेष्णेतर्फे व शेवटीं खुद्द कीचकाची पत्नी रत्नप्रभा हिच्याकडूनहि प्रयत्न करून कीचकाचें मन वळविण्याच्या बाबतींत त्याला जेव्हां यश येईना तेव्हां या क्षुल्लक प्रकरणांत व्यर्थ आपली मानखंडना होत आहे या जाणीवेनें तो जरा बेचैनच झाला. या चमत्कारिक उद्विग्न मनःस्थितींत असतांना तो राणी सुदेष्णेला म्हणाला,

" ह्या क्षुल्लक बाबीला कीचकमहाराज एवढें महत्त्व देतात, ह्याचेंच मला आश्चर्य वाटतें !—एखाद्या दासीला कोणाच्याहि नाटकशाळेंत राहूं नये असें वाटत असलें तर त्याबद्दल तिची तारीफच केली पाहिजे. कीचकमहाराज तुझे भाऊ आहेत, शिवाय माझ्या राज्याचे मुख्य आधारस्तंभ होत, तेव्हां ते मला

प्राणाहूनहि प्रिय आहेत हें सांगावयास नकोच. पण असल्या क्षुल्लक बाबतींत इतका अरेरावीपणा काय कामाचा ?

सुदेष्णा : ही क्षुल्लक बाब कसली ?—चार दिवसांची मुदत कीचकमहाराजांनीं दिली होती तीहि आज टळून गेली; आतां पुढें काय होईल ह्याची मला भीति वाटते हो. बायकांच्या पायीं रणें माजतात गडे. माझ्याच स्वयंवराचे वेळेला लढाई करून इकडून किती राजपुत्रांना जिंकणें झालें, आठवण आहे काय ?

विराट : राजकन्येकरितां युद्ध होईल, कबूल आहे; पण एखाद्या दासीकरितां लढाई ?

त्या दोघांचें हें संभाषण चालू असतां सैरंध्री तें सारें आडून ऐकत होती. तिनें एका विश्वासू दासीमार्फत कंकभटाला व बल्लवाला वसंत बागेंत गुपचूपपणें तिची गांठ घेण्याबद्दल निरोप पाठविला व फुलें तोडण्याचें निमित्त करून ती तिकडे गेली. जातांना सौदामिनीला ती सांगून गेली होती. ठरल्यावेळीं बल्लव व कंकभट बागेंत येतांच तिनें त्यांच्या कानावर ऐकलेला सारा वृत्तान्त घातला. तिला या साऱ्या प्रकरणाचा व कंकभटाच्या त्या बाबतच्या थंड वृत्तीचा आतां इतका वीट आला होता कीं शेवटीं ती त्वाग्यानें उद्गारली, " आतां एक त्या चांडाळ कीचकाला तरी जगांतून नाहींसा केला पाहिजे, नाहींतर मी तरी नाहींशी झाली पाहिजे; एरव्ही हा तंटा मिटणार नाहीं. "

कंकभट : हे दोनहि मार्ग मला पसंत नाहींत. कीचकाला जगांतून नाहींसा करणें—

सैरंध्री : बहुधा तुम्हांला नापसंतच असेल ! जेव्हां तेव्हां असें करून हा वनवास आणि अज्ञातवास मात्र सर्वांच्या मागें लाविलात.—शत्रूंना जर जेथल्या तेथें ठेंचत आलां असतां तर ह्या नीचाची डोळे उघडून मजकडे पहाण्याची काय प्राज्ञा होती ? जे सांगून सवरून शत्रू, त्यांच्याशीं कशाला इतकें नीतीनें आणि दयेनें वागायला पाहिजे ? महाराज, सापाशीं जर आम्ही दयनें वागलों आणि त्याची गय केली तर पुढें त्या सापाच्या दंशानें मरणारांची हत्त्या आपल्या माथीं बसणार नाहीं काय ? ह्या भावी हत्त्येचें पातक चुकविण्याकरितां आज निष्ठुर व निर्दय होणें, हाच सत्य मार्ग आहे असें मला वाटतें.

बल्लव : महाराज, आपणाला जर कोणाशींहि व केव्हांहि निष्ठुरपणें वागावयाचें

नाहीं व परक्यांच्याच सुखाची जेव्हां तेव्हां काळजी वाहायची, तर वनवास संपवून हा अज्ञातवास कां स्वीकारला ? आपलें अजातशत्रुत्वाचें व्रत आजन्म वनवासांत राहून पूर्ण झालें असतें !

सैरंध्री : मला वाटतें ह्या अज्ञातवासाचे दिवस कसे तरी आम्ही कंठले, आणि नंतर दुर्योधनानें आपल्या राज्याचा हिस्सा आपल्याला दिला नाहीं, तर कौरवांच्या बायका अनाथ होतील, एवढ्या कारणावरूनच पुन्हां अरण्याचा रस्ता धरला जाईल !

कंकभट : द्रौपदी, भीमा, मी तुम्हांला पुन्हां एकदां निक्षून सांगतों कीं, आजचा हा कीचकवधाचा प्रश्न तर बाजूलाच राहूं दे, पण उद्यां अज्ञातवास संपल्यावर कौरवांचें पापाचरण अत्युत्कट झालेलें मीं पाहिल्याशिवाय, व त्यांचा संहार न करतां दुसऱ्या कोणत्याहि मार्गानें कौरवांचा उद्धार होणें शक्य नाहीं असें मला वाटल्याशिवाय, सुयोधनाचा वध समरांगणावरहि करावयाला मी संमति देणार नाहीं.

तेवढ्यांत एकदम मोठा गलका व त्यापाठीमागून कीचकाच्या आगमनाची वर्दी देणाऱ्या भालदार—चोपदारांचे आवाज त्यांना ऐकूं आले. त्यासरशी भीम एकदम उसळून म्हणाला, “ हा पहा कीचक अनायासा इकडे येतो आहे—आतां मला परवानगी द्या,—असाच्या असा त्याला चिरडून झाडाच्या ढोलींत देतों फेंकून ! ”

सैरंध्री : नको नको महाराज, ह्यांच्या संमतीशिवाय नको. आपण झटकन् त्या झाडाच्या ढोलींत लपून बसावें; आपण इतक्या जवळ असल्यावर मला बिलकूल भीति नाहीं. आणि तशीच वेळ आली तर मी इतक्या मोठ्यानें ओरडेन कीं, वसंत महालापर्यंत माझ्या आरोळ्या सहज ऐकूं जातील. ”

तिच्या सूचनेनुसार ते दोघेहि चटकन् एका झाडाआड लपले. अपेक्षेप्रमाणें कांहीं वेळानें कीचक तेथें आला, सैरंध्रीला पहातांच त्याला कमालीचा आनंद झाला. तो जरा रुबाबांतच तिला म्हणाला, “ सैरंध्री, ये, अशी जवळ येऊन उभी राहा. येथें तूं काय करीत आहेस ?

सैरंध्री : सुदेष्णा महाराणीसाहेबांकरितां फुलें तोडीत आहें.

कीचक : सैरंध्री, माझें मन तुझ्यावर गेलें म्हणूनच माझ्या नाटकशाळेंत—

सैरंध्री : पाप्या, तोंड आटोपून बोल. साध्वीचा छळ करण्याच्या या तुझ्या पापामुळें तुझ्या शक्तीला कीड लागून ती—

कीचक : सैरंध्री, असल्या बाष्कळ बोलण्यानें तूं आपल्याविषयींची माझ्या मनांतील सहानुभूति मात्र व्यर्थ नाहींशी करून घेत आहेस.

सैरंध्री : आग लागो तुझ्या या सहानुभूतीला !

कीचक : तूं स्वतःला समजतेस तरी कोण सैरंध्री ? तुझी इतके दिवस गय केली म्हणून शेफारलीस वाटतं ? तुम्हां दासदासींना उठतां लाथ व बसतां बुक्की मारली तरच तुम्हीं ठिकाणावर रहाणार ! तुम्हांला जरा गोडीगुलाबीनें वागविलें कीं लगेच तुम्हीं स्वतःला आमच्या बरोबरीचें लेखूं लागतां; आणि त्या मिजाशींत आमच्या-सारख्या सत्ताधाऱ्यांच्या सत्तेचे तीनतेरा वाजविण्याची तुम्ही वेळ आणतां. तें कांहीं नाहीं. तुझी आतां गय करतां कामा नये. तुझ्या मुसक्या बांधून तुला भर रस्त्यांतून फरफटत ओढीत महालाकडे नेली पाहिजे. ”

असें म्हणून कीचक चटकन् पुढें झाला व त्यानें तिचा हात पकडिला. सैरंध्रीनें त्याच्या हातून निसटण्याकरितां खूप धडपड केली परंतु त्यांत तिला बिलकूल यश येईना. शेवटीं लाजलज्जा सारी गुंडाळून ती जेवढें मोठ्यानें ओरडतां येईल तेवढें ओरडून म्हणाली, “धांवा हो धांवा कोणी तरी या दुष्ट लांडग्यापासून ह्या अनाथ गाईचें संरक्षण करा.” तिच्या हांकेला कोणी उत्तर देण्याचें चिन्ह दिसेना; त्यासरशी कीचकाला अधिकच उन्माद चढला व तो तिला ओढीत ओढीत वसंत बागे बाहेर नेऊं लागला. परंतु तो जेमतेस बागेच्या दारापाशीं पोंहोंचला असेल नसेल तोंच तेथें राणी सुदेष्णा व रत्नप्रभा अचानक-पणें आलेल्या त्याला दिसल्या. सौदामिनीकडून व मैत्रेयाकडून त्यांना अनुक्रमें सैरंध्री व कीचक वसंत बागेंत गेल्याचें कळलें होतें. अर्थातच तेथें कांहींतरी विपरीत प्रसंग उद्भवणारच या कल्पनेनें त्या बागेच्या बाहेर उभ्याच होत्या. सैरंध्रीची केविलवाणी हांक ऐकतांच त्यांना तावडतोब पुढें होऊन तिची सुटका करावीसें वाटूं लागलें. परंतु कीचक-कोपाच्या धास्तीनें त्या पुढें होईनात.

सैरंध्रीच्या लागोपाठ दोनतीन किंकाळ्या ऐकतांच मात्र त्यांचा सारा संयम सुटला. व त्यापुढें झाल्या. त्या दोघींना पहातांच कीचकानें चटकन् सैरंध्रीचा हात सोडून दिला; परंतु त्यांच्या आगमनानें तो कमालीचा डिंवचला गेलेला दिसत होता.

रत्नप्रभा : महाराज, काय हा अविचार !

सुदेष्णा : गरीब अबलेवर बलात्कार करण्यांत काय बरें पुरुषार्थ आहे ?

कीचक : सुदेष्णा राणीसाहेब आतां केवळ तुमच्या शब्दाकरितां हिला सोडतों आहे खरी. परंतु तुम्हांला आतां शेवटचें बजावतों आहे कीं, विराटमहाराज व कीचक यांमध्यें उघड उघड दुष्मानगिरी होऊं नये अशी जर आपली इच्छा असेल तर, तुमच्या ह्या उर्मट दासीला हा सूर्यनारायण अस्ताला जाण्यापूर्वीं माझ्या नाटकशाळेंत पाठवून द्या." येवढेंच बोलून कीचक तेथून एखाद्या दुखावलेल्या सर्पाप्रमाणें फुसफुसत निघून गेला.

वसंत बागेंतील प्रकार सकाळीं घडला होता. दुपारीं दोन प्रहराच्या सुमारास राजानें अगदीं खाशा मंडळींचा दरबार या प्रकरणाचा विचार करण्याकरितां बोलाविला होता. कारण सैरंध्री कीचकाकडे जाण्यास बिलकुल तयार नव्हती. वेळच आली तर ती आपल्या जीवाचें कांहीं बरेंवाईटहि करून घेईल पण कीचकाकडे जाणार नाहीं अशी सर्वांची पूर्ण खात्री होती. अशा स्थितींत आपण कसें वागावें हे विराटाला कळेनासें झालें होतें; आणि म्हणूनच त्यानें कांहीं खाशा मंडळींचा दरबार भरवून त्यांच्याशीं तो या बाबतीत विचारविनिमय करीत होता.

विराट : गुरुमहाराज, पुरोहितमहाराज, ह्या प्रसंगीं काय करावें, हेंच मला बरोबर समजत नाहीं. मन द्विधा होत असून पाप व पुण्य हीं दोन्ही मला सारखींच भयंकर वाटत आहेत. ह्या साऱ्या प्रकरणाची मी तुम्हाला सविस्तर माहिती दिलीच आहे. तेव्हां यासंबंधानें धर्माज्ञा काय आहे ती आपणापासून ऐकावी अशी माझी इच्छा आहे.

राजगुरु : महाराज, धर्माज्ञेसंबंधानें ह्या बाबतींत संशयाला जागाच नाहीं. कोणी

कोणावर जुलूम करावा असें धर्म कधींच सांगणार नाहीं.

पुरोहित : स्त्रियांवर बलात्कार करणाराला, कांहीं प्रसंगीं तर कटाग्नीचें* देहान्त प्रायश्चित सांगितलें आहे.

कंकभट : महाराज, मध्येंच बोलतों ह्या कसुरीबद्दल माफी असावी. कोठें पापाचरण होत असेल तर तें हुडकून काढून त्याचा बंदोबस्त करण्याकरितां राजांचीं सिंहासनें स्थापलेलीं असतात. रामराज्यांत एक मनुष्य अकालीं मरण्याबरोबर ह्या अपमृत्यूची जबाबदारी सर्व ऋषींनीं रामचंद्राचे माथीं मारली, हें महाराजांस विदितच आहे. अनाथांकडून बलात्कार मुकाट्यानें सोसला जातो किंवा हताश होऊन दुबळी प्रजा दुःखांतच दिवस काढीत गप्प बसते, असें पाहून जर राजे लोक आपल्या कर्तव्यास जागेनासे झाले, तर त्यांच्या सिंहासनाच्या खालचा धर्माचा पाया त्यांना न कळत खचत जाऊन बोलतां बोलतां सिंहासन तिरपागडें झाल्यावांचून रहात नाहीं. म्हणून महाराजांपाशीं माझी विनंति आहे कीं, दासींच्याहि मनाची प्रवृत्ति पातिव्रत्यभंगाकडे न होईल अशी खबरदारी घेणें, हें सरकारचें पवित्र कर्तव्य आहे.

विराट : कंकभटजी, हा धर्म मला कळतो पण प्रत्यक्ष व्यवहारांत वळत नाहीं. परंतु—

परंतु राजा विराटाचें वाक्य पुरें होऊं शकलें नाहीं. कारण तेवढ्यांत महाद्वारांतून सैरंध्री धांवत येत असलेली त्याला दिसली. तिचीं वस्त्रें व केंस विस्कटलेले दिसत होते. अतिश्रमानें व भीतीनें तिचा चेहरा पार काळवंडून गेला होता. धांवत धांवत येऊन तिनें विराटाचे पाय धरिले व ती काकुळतीनें म्हणाली, " धर्मावतार विराटमहाराज, ह्या गाईच्या लाजेचें ह्या दुष्ट लांडग्यापासून रक्षण कराहो. विराटाच्या दरबारांत माझी लाज—"

" कोण संभाळतो तें आतां मला पाहूं देच ! " तिच्या मागोमाग धांवत आलेल्या कीचकानें तिचें वाक्य पुरें केलें.

---

*कटाग्नि [ सं. कट (गवत) + अग्नि ]—अपराध्याच्या अंगाभोंवतीं गवत किंवा कडबा बांधून तें पेटविणें. ही शिक्षा.

विराट : माझ्या दरबारांत—माझ्या समक्ष—असलें वर्तन—मी नाहीं चालूं देणार.

राजगुरु : कसलें हें राक्षसी कृत्य !

पुरोहित : काय हें पशुतुल्य पापाचरण !

कीचक : ह्या माझ्या कृत्याला पशुतुल्य पापाचरण म्हणा, राक्षसी कृत्य म्हणा, किंवा राजा विराट, तुझ्या डोळ्यादेखत झालेला हा तुझा अपमान समज. हा कीचक,—ह्या दरबारांत, राजा, गुरु, पुरोहित ह्या सर्वांचे डोळे उघडे असतांना हिला असा खेंचून नेणार आहे.

सैरंध्री : राजा विराट, ह्या चांडाळाचा बंदोबस्त ह्या क्षणीं तुझ्या हातून झाला नाहीं तर माझें रक्षण करणारे जे कोणी असतील ते या ठिकाणीं प्रकट होतील आणि तुझें हें पुरातन सिंहासन कीचकाच्या रक्तानं माखलें जाईल.

कंकभट : राजा, सर्वांचा संहार न व्हावा असें जर तुझ्या मनांत असेल तर ह्या कीचकाला आवरून धर.—अधर्म अखेरीस सर्वांचीं पाळेंमुळें खणून काढल्याशिवाय रहाणार नाहीं.

सैरंध्री : विराटमहाराज, आपल्या सिंहासनाचा आसरा घेऊन मी आपणांस शरण आलें आहें.—आपल्या सिंहासनाची जी अब्रू तीच माझी अब्रू आहे. दोन्ही अब्रूंचें रक्षण करण्यास आपण समर्थ आहां.

कीचक : राजा विराट, आपणाला माझा एकच सवाल आहे. मी आपणांस पाहिजे असेन तर ह्या सैरंध्रीला माझ्या ताब्यांत आतांच्या आतां दिली पाहिजे. जर ह्या क्षणीं सैरंध्रीला आपण माझ्या स्वाधीन केली नाहीं तर आपणांस मी नको आहें असें मानून,—राजा विराट, म ऽ ऽ ग—मग माझ्या बाहुबलानें स्थिर झालेलें हें तुझें सिंहासन उलथून पाडण्याला मला एक क्षणहि लागणार नाहीं, हें तुला माहीत आहेच. राजा तुझ्या तोंडून निघणाऱ्या निर्णयाची मी वाट पहात आहें.

विराट : गुरुमहाराज, पुरोहित महाराज, ह्या बिकट प्रसंगीं मी राजा धृतराष्ट्राचें अनुकरण करणार.

पुरोहित : ह्या प्रसंगीं तसेंच करणें योग्य.

विराट : कीचकमहाराज, पांडव वनवासाला जाण्यापूर्वी द्रौपदी वस्त्रहरणाचे वेळीं

राजा धृतराष्ट्रानें जे हुकूम केले, तेच हुकूम मी आतां करीत आहें; व ते आपणां सर्वांनीं मानलेच पाहिजेत.

कीचक : राजा, तुझे हुकूम जर योग्य असतील तर ते मी अलबत मान्य करीन.

विराट : भरदरबारांत सैरंध्री हरण करण्यास आम्ही तुम्हांस मनाई करीत आहोंत. सुयोधन जसा धृतराष्ट्राला प्रिय त्याप्रमाणेंच आपणहि आम्हांला फार प्रिय असून आमच्या डोळ्यादेखत आपल्या हातून पापाचरण घडावें हें आम्हांला इष्ट वाटत नाहीं. तथापि एखाद्या क्षुल्लक दासीकरितां आपण व आम्ही वैरी व्हावें हेंहि इष्ट नसल्यामुळें आतांच्या आतां आम्ही ह्या सैरंध्रीला शहराबाहेर वनवासास पाठवून देतों.—आमचे दूत आतां हिला देवीवनांतील भैरवाचे देवालयांत सोडून येतील.—सैरंध्री, ह्या दरबारांत मी तुझी अब्रू राखिली आहे. तुझ्यासारख्या एखाद्या दासीसाठीं कीचकमहाराजांचा मी शत्रू होणें राजकाजास विघातक असल्यामुळें वनवासांत मजवर विसंबून न रहातां तूं तुझे स्वतःचे जे कोणी रक्षणकत असतील त्यांवरच अवलंबून रहावें हें बरें !"

× × ×

मध्यरात्रीचा समय होता. जंगलांतील एकां वृक्षाआड कंकभट व बल्लव उभे होते. ते उभ्या असलेल्या जागेपासून भैरवाचें मंदिर अगदीं दृष्टीच्या टप्प्यांत होतें. सैरंध्रीची वाट बहुधा ते बघत असावे. अगदीं हलक्या आवाजांत त्यांची कुजबुज चाललेली होती.

कंकभट : भीमा, नाइलाज होऊन कीचकवधाला मी संमती देतों खरा—परंतु—

बल्लव : परंतु काय ?

कंकभट : परंतु यानं आपणां पांडवांच्या व्रताला तर कांहीं वैगुण्य येत नाहींना या कल्पनेनें मन कसें अजूनहि साशंक होत आहे !

बल्लव : पण कोणचें तें व्रत ?

कंकभट : लोभाला किंवा क्रोधाला बळी पडून अधर्म करण्यास प्रवृत्त न होणें.

बल्लव : दरबारांतला सायंकाळचा प्रकार पाहिल्यावरहि कीचकवध हा अधर्म आहे, असें महाराज, आपल्याला वाटतें काय ?

कंकभट : केवळ कीचकाकडे पाहिलें म्हणजे कीचकवधांत अधर्म होत आहेसें वाटत नाहीं; प ऽ ण—

बल्लव : पुन्हां 'पण' आहेच का ?

कंकभट : पण भीमा, आपण आज कित्येक महिने ज्या राजा विराटाच्या आश्रयानें राहिलों आहों त्याची शक्ति या कीचकवधामुळें लंगडी झाल्यानें त्याचें मन उदास नाहीं का होणार ?

बल्लव : दादा, ज्या आमच्या शक्तीनें कीचक मारला जाईल, तीच शक्ति पुढें विराट राजाचे उपयोगी नाहीं का होणार ? आणि मग कीचकवधाची आठवण विसरून राजा विराट पांडवांवर पूर्ववत् प्रेम नाहीं का करूं लागणार ?

कंकभट : असें होईल खरें; पण भीमा, कीचकाला न मारतांहि राजा विराटाचे प्रेमास जर पांडव पात्र झाले, तर अधिक चांगलें होईल.—भीमा, कीचक कर्ता असून उन्मत्त आहे, आणि अशा पुरुषांना मऊ पाडण्याचा एकच उपाय आहे. त्यांच्याहून श्रेष्ठ अशी शक्ति त्यांना दाखविली म्हणजे—ते मूळचे धर्मभीरु असल्यास आपोआप सन्मार्गाला लागतात. भीमा, तुझी प्रचंड शक्ति कीचकाला दाखीव. आणि नंतर पांडवांचा पक्षाभिमानी होण्याबद्दल त्याला विनंति कर.

कंकभटाच्या या अतिरेकी-मवाळ वृत्तिबद्दल त्याच्यावर रागवावें कीं त्याची कींव करावी हेंच बल्लवाला कळेना. तो ती चर्चा आवरती घेण्याच्या उद्देशानें म्हणाला, "हें पहा, दादा, आतां मला जाऊं द्या. ह्या वाटाघाटींत भैरवाच्या मंदिरांत जाऊन लपण्यास मात्र मला उशीर होत आहे. तुम्ही अगदीं माझ्यावर विश्वास ठेवा कीं माझ्या हातून कोणत्याहि परिस्थितींत अधर्माचें वर्तन होणार नाहीं. तुम्ही आतां चटकन् वाड्यांत जा. आपण दोघेहि तिथें नसलों म्हणजे व्यर्थ एखाद्याला शंका यावयाची ! हं जा. मीहि जातोंच." असें म्हणून भीम झपाट्यानें भैरवाचे मंदिराकडे निघून गेला. त्याच्या पाठमोऱ्या आकृतिकडे कांहींसें साशंक नजरेनें व कांहींसें भीतीनें पहात धर्म तेथेंच जरा वेळ उभा राहिला. भीम मंदिरांत शिरलेला पहातांच त्यानें भक्तिभावानें हात जोडले व प्रार्थना केली,— "भैरवमहाराज, कीचकाला मल्लयुद्धांत पराभूत करून प्राणघात करण्याच्या

इरादानें भीम कीचकाच्या उरावर बसला असतां, मानापमानाच्या खोट्या कल्पनेचा पगडा कीचकाच्या मनावर बसूं देऊं नको, व कीचक अखेरीस पांडवांचा पक्षपाती होऊन विराट नगरींतील पांडवांचा अज्ञातवास पांडवांना शांतिदायक व विराट राजाला कीर्तिदायक कर." आणि नंतर खिन्न मनानें तो जंगलाबाहेर पडला.

मध्यरात्रीं दोनच्या सुमारास राजसेवकांनीं सैरंध्रीला देवालयांत आणून सोडिलें. त्या निर्मनुष्य जंगलांतील देवालयांत, त्या तशा भीषण समयीं तिला एकटें टाकून जाण्याचें त्यांच्याहि खरें जिवावर आलें होतें, परंतु सैरंध्रीबाबत दयाबुद्धि दाखविण्यास जेथें खुद्द राजाचीहि छाती नव्हती तिथें ते बिचारे नोकर काय करणार ? राजसेवकांची पाठ वळून पांच एक मिनिटें झालीं नाहींत तोंच कीचकाची स्वारी मंदिरांत प्रविष्ट झाली. आपला नेहमींचा लष्करी वेष अंगावर धारण न करितां त्यानें एखाद्या रंगेल माणसास शोभेसा—किंचित् छाकटाच पोषाख केलेला दिसत होता. तो सडाच आला होता. ज्या वाहनांतून तो आला होता तें वाहन त्यानें बरेंच दूर उभें केलें होतें. कीचकाला मंदिरांत पहातांच सैरंध्रीचें सारें अवसानच अगदीं गळाल्यासारखें झालें. कारण तिच्या मदतीला या अशा वेळीं, इतक्या निर्जन स्थळीं कोण येणार ? नेहमींप्रमाणें या संकटापासून कसा बचाव करावा ह्याबाबत विचारविनिमय करण्यासाठीं ह्या वेळीं तिला कंकभटास वा बल्लवास भेटणें शक्य झालें नव्हतें. परंतु संध्याकाळीं विराटानें दरबारांत जेव्हां आपला निर्णय दिला तेव्हां कंकभट तेथें उपस्थित असल्यानें तो कदाचित् या बाबतींत कांहीं खटपट करील अशी तिला अंधुक आशा होती. परंतु त्याचें शांतताप्रेम, मवाळ धोरण व अजातशत्रुत्वाचें वेड लक्षांत घेतां तो पुन्हां राजा विराटाचें मन वळविण्याचा प्रयत्न करणार या कल्पनेनें तिच्या मनांतील तो अंधुक आशेचा किरणहि तावडतोब वितळे ! अशा प्रसंगीं साऱ्या अडीअडचणींना व संकटांना गुंडाळून ठेवून तिला मदत करूं शकणारा जहाल प्रवृत्तीचा बल्लव तिला कोठें भेटला होता ?

घाबरलेली सैरंध्री दृष्टीस पडतांच कीचकाला अगदीं जिंकल्यासारखें वाटूं लागलें. हातांतील हार पुढें करीत तो सैरंध्रीला म्हणाला, "सैरंध्री, आतां या

भैरवाला साक्षी ठेऊन साक्षी काय करावयाचा !—हा भैरव माझा बिछाना साफ करणारा पानदानावरील माझा हुजऱ्या आहे असें समजून—

सैरंध्री : दुष्टा, देवांची अशी निर्भत्सना करतोस ?

कीचक : माझ्याशिवाय ह्या विश्वांत, सैरंध्री, दुसरा कोणीहि श्रेष्ठ नाहीं. मी प्रथम आणि देवबिव सर्व मागाहून. मी राजांचा राजा—देवांचा देव आहें असें मानून, सैरंध्री, माझ्या गळ्यांतला हा हार तुझ्या गळ्यांत घालण्याची मला परवानगी—

सैरंध्री : खबरदार, चांडाळा, पुन्हां असें कांहीं वेडेंवांकडें बोलशील तर.

कीचक : सैरंध्री हा हट्टीपणा आतां पुरे झाला !—यापुढें तुझी इच्छा असो वा नसो, तुला येथून उचलून नेऊन रथांत घालून माझ्या महालांत आतां मी नेऊन ठवण्याचा निश्चय केला आहे. आपण होऊन येणार कीं—

सैरंध्री : प्राणनाथ, धांवा धांवा, हा चांडाळ कीचक—ह्या द्रौपदीची अब्रू—

कीचक : काय तूं द्रौपदी आहेस ? वाः— फारच उत्तम झालें. जी गोष्ट सुयोधनाच्या हातून सिद्धीस गेली नाहीं, ती मी आज शेवटास नेतों." असें म्हणून कीचक सैरंध्रीचा हात धरण्यासाठीं पुढें झाला. परंतु तो आपल्या रोखानें जवळ येत आहे हें पाहतांच सैरंध्री चटकन् भैरवाच्या मूर्तीला मध्यें घालून पलिकडे उभी राहिली व भैरवाचे पाय भक्तीभावानें स्पर्शीत तिनें प्रार्थना केली, "भैरव महाराज, ह्या पाप्याचा बळी घेऊन ह्या दीन गाईला ह्या संकटांतून सोडवा हो."

कीचकः—द्रौपदी, माझ्या ताब्यांतून तुला सोडावण्याची ह्या भैरवाची काय प्राज्ञा आहे ?—माझ्या शक्तीचा आतांच चमत्कार पहावयाचा असल्यास मला आज्ञा कर; डाव्या हातानें ह्याची शेंडी धरतों, आणि उजव्या हातानें एक बुक्की ह्याच्या छाताडावर मारून ह्याच्या धडाचें चूर्ण करून, निराधार झालेलें ह्या भैरवाचें शीर तुझ्या पायावर वाहतों. सैरंध्री बघच आतां चमत्कार—" असें म्हणून कीचकानें खरोखरीच आपली मूठ त्वेषानें वर उगारून भैरवाच्या छातीजवळ नेली; परंतु ती मूठ भैरवाचे छातींत बसण्यापूर्वींच भैरवाच्या त्या जड मूर्तिकडून ती बरच्यावर झेलली गेली. इतक्या वेळ पाषाणवत् असलेली ती भैरवाची मूर्ति

निमिषार्धांत सचेतन झाली व तिनें कीचकाला अशी एकच जोराची गचांडी दिली कीं तो दोनतीन कोलांट्या खाऊन समोरच्या भिंतीवर आदळला. स्वतःला कसेंबसें सांवरून कीचक भैरवाच्या मूर्तीकडे आश्चर्यानें पाहूं लागला तों त्या मूर्तीच्या मुखांतून पुढील शब्द त्याच्या कानावर पडले. "कीचका, धुंधर्या, तुझी छाती असली तर, भीमाकडे पहा. बल्लव म्हणतात तो हा मी, भीम म्हणतात तो हा मीच,—तुझ्या मानगुटीवर बसून तुझीं हाडें फोडण्याला तयार आहे— बोल आतां—

कीचक : तूं भैरव ऐस किंवा भीम ऐस, तुझ्याशीं मल्लयुद्ध करायला मी तयार आहें.

भीम : मूर्खा, तूं काय माझ्या बरोबरीचा म्हणून तुझ्याशीं युद्ध करीत बसूं ? एकच बुक्की तुझ्या छातीवर मारतों आणि देतों तुला टाकून गिधाडांच्यापुढें.— रत्नप्रभेकडे व विराटाकडे लक्ष देऊन एका अटीवर पाहिजे तर तुला जीवदान देण्याविषयीं धर्मराजाची मला आज्ञा आहे. सैरंध्रीच्या रक्षणकर्त्यांनीं मला गुलाम करून तीन पाट काढून जीवदान दिलें, असें विराटाच्या दरबारांत जाहीर करण्याला जर तूं, नरपशो, तयार असलास, आणि आमचे अज्ञातवासाचे दिवस संपेतोंपर्यंत आमच्याविषयीं मौनव्रत धरावयास जर कबूल असलास, तर कीचका रत्नप्रभेकरितां व विराटाकरितां—धर्मराजाच्या आज्ञेनें तुला जिवंत सोडतों.

कीचक : जिवंत राहून द्रौपदीचा गुलाम होण्यापेक्षां युद्ध करून जिवंत राहिलों, तर द्रौपदीला माझ्या रंगमहालांत ठेवीन.

भीम : आपला रंगमहाल आतां गिधाडांच्या वस्तींत !—सैरंध्री, जित्याची खोड मेल्याशिवाय जावयाची नाहीं.

असें म्हणून भीम चटकन् पुढें झाला. कीचकाचा अंगरखा पकडून त्यानें त्याला जरा पुढें खेंचलें व निमिषार्धांत एकच इतका जोराचा मुष्टिप्रहार त्याच्या छातीवर केला कीं तत्क्षणीं तो खालींच कोसळला. रक्ताची एक भलीमोठी गुळणी टाकून कीचकाचें धडपडणारें शरीर कांहीं वेळानें शांत झालें ! त्याचा पूर्णपणें

निकाल झाल्याची निश्चिति पटतांच भीम द्रौपदीला म्हणाला, "चल द्रौपदी, आपण आतां परत विराट नगरींत जाऊं व धर्मराजाचें दर्शन घेऊन पुढें काय करावयाचें तें ठरवूं."

द्रौपदी : पण महाराज, आपण येथें केव्हां आलांत तें अगोदर सांगायचें होतें.

भीम : कीचकवधासंबंधानें धर्मराजाची शेवटची आज्ञा ऐकून मी वनाकडे आलों. वनांत कोणी निशाचरानें चुकून मला पाहिलें तर दैवी चमत्कारानें कीचक मारला गेला असें त्याला वाटावें म्हणून वनाजवळ येतांच मी भैरवाचें सोंग घेतलें व कोणी मंदिरांत येण्यापूर्वींच भैरवाची मूर्ति बाजूला ठेवून त्या जागीं उभा राहिलों.—जाऊं दे तें सारें आतां!—चल त्या खऱ्या भैरवाला आतां परत जागच्या जागीं ठेवून त्याला नमस्कार करूं व नंतर धर्मराजाकडे जाऊन ही सारी हकिकत त्याच्या कानावर घालूं या."



## प्रकरण....६ वें

ग्रँट डफनें लिहिलेला ' मराठ्यांचा इतिहास ' ( **History of the Marathas** ) हा बराच काळ प्रमाण मानला जात असे. त्यांतील बरींच विधानें मराठ्यांच्या पूर्वजांना कमीपणा आणणारीं अशीं होतीं. या विधानांना मुद्देसूदपणें खोडून काढण्याचा पहिला प्रयत्न श्री. नी. ज. कीर्तने यांनीं ' ग्रँट डफकृत मराठ्यांच्या इतिहासावरील टीका ' ( १८६८ ) या निबंधाच्या रूपानें केला. या टीकेपासून इतिहासविषयक संशोधनाला एक नवीनच कलाटणी मिळाली. या नव्या स्वतंत्र दृष्टिकोनांतूनच दाजीसाहेब सरंजाम्येकृत ' अलिजा-बहादुर शिंदे यांचा इतिहास ', वि. गो. भिडेकृत 'अष्टप्रधानांचा इतिहास' हे ग्रंथ लिहिले गेले. विष्णुशास्त्री चिपळुणकरांचें ' काव्येतिहास-संग्रह ' हें मासिक सुरू झालें. १८७८ पासून विष्णुशास्त्र्यांच्या "निबंधमालेपासून लोकांच्या मनांत नवीन क्रांति होऊं लागली होती; आणि स्वदेश, स्वभाषा आणि स्वधर्म यांविषयींचा अभिमान वाटूं लागला होता. आपलें तें सर्व वाईट, असें म्हणण्याचा मागचा काळ जाऊन त्याच्या उलट प्रतिक्रिया सुरू झाली होती. अशा वेळीं आपल्या पूर्वजांच्या पराक्रमाचीं रसभरित वर्णनें ज्यांत केलीं आहेत अशा बखरी प्रसिद्ध होऊन वाचण्यांत आल्यामुळें लोकांच्या भावनांना अधिक जोर चढला व व्याख्यानांतून, कीर्तनांतून, पुराणांतून आणि कवनांतून या अभिमानाचें वारें सर्वत्र जोरानें खेळूं लागलें. " ( द. वा. पोतदार-" अर्वाचीन मराठी साहित्य " -पृ. २२२ ) मराठींतील ऐतिहासिक नाटकांचा उगम या विशिष्ट अशा तत्का-लीन वातावरणांतून झालेला आहे.

वि. ज. कीर्तनेकृत ' थोरले माधवराव पेशवे ' ( १८६१ ) हें मराठींतील पहिलें स्वतंत्र ऐतिहासिक नाटक होय. त्यानंतरचीं उल्लेखनीय नाटकें म्हणजे— ' झांशीच्या राणीचें नाटक ' ( १८७० ), वि. त्रिं. मोडककृत ' पानपतचा मुकाबला ' ( १९०१ ), किरातकृत ' पानपतचा दुर्दैवी मोहरा ', वासुदेवशास्त्री खरेकृत ' गुणोत्कर्ष ' व ' शिवसंभव ' ( १९१९ ), कृ. प्र. खाडिलकरकृत

कै. नरसिंह चिंतामण केळकर



जन्म : १८७२ : मृत्यु : १९४७

' सवाई माधवरावाचा मृत्यू ' (१८९६) व ' भाऊबंदकी ' (१९१० ), गडकरीकृत ' राजसंन्यास ' (१९१७), औंधकरकृत ' बेबंदशाही ' (१९२३); न. चिं. केळकरकृत ' तोतयाचें बंड ' (१९१२ ), ' अमात्य माधव ' (१९१४ ), ' चंद्रगुप्त ' (१९१६ ), बॅ. सावरकरकृत ' सं. संन्यस्त खड्ग ' (१९३१ ) व अ. ब. कोल्हटकरकृत ' विवेकानंद ' व वरेरकरकृत ' करीन ती पूर्व ' हीं होत. हीं ऐतिहासिक नाटकें म्हणजे पौराणिक व सामाजिक नाटकांना सांधणारा दुवा. सामाजिक नाटकांच्या वाढत्या प्रसाराबरोबर साहजिकच ऐतिहासिक नाटकें लिहिण्याकडे अलीकडील नाटककारांचें फारसें लक्ष जात नाहीं.

श्री. न. चिं. केळकर यांनीं एकूण आठ नाटकें लिहिलेलीं आहेत. तीं पुढीलप्रमाणें:–' सरोजिनी ' ( १८९७ ), ' नवरदेवाची जोडगोळी ' (१८९८), ' तोतयाचें बंड ' ( १९१२ ), ' चंद्रगुप्त ' ( १९१३ ), ' कृष्णार्जुन युद्ध ' ( १ जानेवारी १९१५ ), ' अमात्य माधव ' ( १७ ऑगस्ट १९१५ ), ' सं. वीर विडंबन ' ( १ फेब्रुवारी १९१९ ) व ' संत भानुदास ' ( १६ मार्च १९१९ ).

केवळ ऐतिहासिक नाट्यसृष्टींतच नव्हे तर एकंदर मराठी नाट्यसृष्टींत 'तोतयाचें बंडा'चा क्रम फार वरतीं लागेल. नाना व पार्वतीबाई या मुख्य पात्रांचें व बगंभट, विठाई, अमला वगैरे गौण पात्रांचें मार्मिक स्वभावदर्शन, तत्कालीन सामाजिक परिस्थितीची व राजकीय घडामोडींची अत्यंत यथार्थपणें कल्पना देणारें ऐतिहासिक वातावरण, भाषेंतील प्रसाद व कथावस्तूची आकर्षक व उत्कट अशी रचना—या गुणांमुळें नाट्यतंत्रदृष्ट्या ह्या नाटकाला फार उच्च स्थान प्राप्त झालेलें आहे. पानपतच्या युद्धांत आपला पति—भाऊसाहेब पेशवा—हा मारलाच गेला नाहीं अशी त्याची पत्नी पार्वतीबाई हिची दृढ समजूत होती; व त्यानुसार ती त्याच्या मृत्यूनंतर एका तपाहून अधिक काळ सारे सौभाग्यलंकार धारण करीत असे. या तिच्या समजुतीला उत्तर हिंदुस्थानांतून, ' मीच भाऊसाहेब आहें ' असें सांगत आलेल्या व भाऊसाहेबाप्रमाणें कांहीं प्रमाणांत दिसणाऱ्या एका गृहस्थाच्या आगमनानें अधिकच जोर आला. कांहीं सरदार

मंडळीहि या गृहस्थाला सामील झाली. आणि या साऱ्या बनावामुळें नाना फडणिसाला हें तोतयाचें बंड म्हणजे स्वतःच्या 'आयुष्यांतलें एक भारी संकट' वाटूं लागलें. आपल्या बुद्धिकौशल्यानें त्यानें हें बंड कसें मोडलें तें प्रस्तुत नाटकांत सांगितलें आहे.

'तोतयाचें बंड' ह्या नाटकाचा पहिला प्रयोग 'श्रीभारत नाटक मंडळी' नें पुणें येथील 'किर्लोस्कर नाटकगृहां'त १९१२ सालच्या दसऱ्याच्या दिवशीं करून दाखविला. हें नाटक गोष्टीरूपानें पुढें दिलें आहे.

## तोतयाचें बंड

नाटककार

**नरसिंह चिंतामण केळकर**

नाना : मी परमेश्वरशपथ सांगतों, हरिपंत, आजच्याइतका उदास मी साऱ्या जन्मांत कधींहि झालों नव्हतों. वास्तविक पहातां आज भाऊसाहेब खरोखरीच जिवंत असते तर त्या बातमीमुळें माझ्याइतका आनंद या साऱ्या मराठी राज्यांत कुणालाहि—

हरिपंत : भाऊसाहेब जिवंत नाहींत असे निश्चितपणें ठरल्यावर या नसत्या कल्पनोच्या आहारीं आपल्यासारख्यांनीं तरी जाणें इष्ट नव्हे !

नाना : पण ते जिवंत असण्याच्या नुसत्या कल्पनेनेंच आमच्या लोकांना किती मोह पडला आहे पाहिलात ना ! दादांच्या पक्षाला चौदा वर्षांत जितकी मदत आमच्या सरदारांकडून झाली नाहीं, तितकी मदत अवघ्या चार महिन्यांत या तोतयाला त्यांच्याकडून व्हावी अं ! घोरपडे, हस्वाण्णा, पटवर्धन हे सुद्धां तिकडे गेले !—तेव्हां आतां या खुळाला म्हणावं तरी काय ! असो, ईश्वराची इच्छा ! हेहि दिवस जातील ! आपण आपल्या उद्योगाला लागलं पाहिजे. बरं; बोरघाटाकडे फौज पाठवायची योजना कोठवर आली आहे ?

हरिपंत : तें सर्व ठीक चाललं आहे. भिवराव पानसे पुढं रवाना झालेच आहेत, आणि पाटिलबुवांच्या फौजेचा तळ हालून पहिला मुक्काम विठ्ठलवाडीवर पड-

त्याचं समजलं आहे. मीहि इथला बंदोबस्त करून पाटिलबुवांच्या मागोमाग निघेन म्हणतों. आपण आतां बिलकूल चिंता करूं नये.

नाना : हरिपंत, तुम्ही आहां म्हणून मला कशाची काळजी नाहीं. मी पुरंदरावर बाळराजाला घेऊन तुमच्या जिवावर निर्भय असतों.

हरिपंत : आमचं तरी सांगणं तेंच आहे. आपण इकडची काळजी करूं नये. आम्ही तोतयाला कांहीं चोरघाट वलांडून येऊं देत नाहीं, हीच प्रतिज्ञा. आमचं खरं लक्ष, आमची खरी काळजी पुरंदरासंबंधानं. तिकडचा बंदोबस्त नीट राहिला, धाकट्या श्रीमंतांचं आरोग्य असलं, म्हणजे त्यांत सर्व कांहीं आलं. बरं मी येऊं आतां ?

हरिपंत फडके निघून गेल्यावर नाना फडणीस पुन्हां साचिंतपणें आपल्या महालांत फेऱ्या घालूं लागले. मराठी राज्यावर ओढवलेल्या कितीतरी लहानमोठ्या प्रसंगांना त्यानं आतांपर्यंत मोठ्या धैर्यानें व कौशल्यानें तोंड देऊन त्यांतून मार्ग काढिला होता. माधवराव पेशव्याच्या मृत्यूनंतर राघोबानें माजविलेला गृहकलह, स्वकीय सरदारांनीं सरंजामाच्या लोभानें आपापसांत चालविलेली यादवी, करवीरकर, मुंबईकर व हैदरखान ह्यांपासून वारंवार होत असलेला उपद्रव या व यांसारख्या कित्येक संकटांच्या खडकांना मोठ्या शिताफीनें हुकवून मराठी राज्याची नौका आतांपर्यंत तरी त्यानें यशस्वीपणें व योग्य मार्गानें वल्हवित आणिलेली होती. परंतु आज मात्र त्याच्यापुढें जें संकट आ वासून उभें होतें तें अगदीं त्याची अक्कल गुंग करून टाकणारें होतें !

१७६१ सालीं पानपतच्या युद्धांत मराठ्यांचा पराभव झाल्यानंतर चारी दिशांना पांगूं लागलेल्या त्यांच्या सैन्याची मुसलमानांच्याकडून जी अघोर कत्तल झाली, तींत सामान्य शिलेदारबारगिरांबरोबरच फार मोठमोठे सरदार व सेनापतिहि मारले गेले. त्यांपैकीं कित्येकांचीं प्रेतेंहि मागाहून सांपडलीं नाहींत. सदाशिवराव भाऊचें ( नानासाहेब पेशव्यांचा धाकटा भाऊ व पहिल्या बाजीरावाचा मुलगा ) असेंच झालें. अंबारींत बसून सैन्याचें नेतृत्व करीत असलेल्या विश्वासरावाला गोळी लागतांच सदाशिवरावभाऊ सूडाच्या भावनेनें इतका बेफाम झाला कीं

एकदम तो अंबारींतून उतरून घोड्यावर स्वार होऊन ऐन रणधुमाळींत सामील झाला. नेता दिसेनासा होतांच मराठी सैन्यानें कच खाल्ली व तें माघार घेऊन पळूं लागलें. या पळणाऱ्या सैन्याची शत्रुसैन्यानें अक्षरशः लांडगेतोड केली. या गोंधळांत भाऊसाहेबाचें नक्की काय झालें याचा शेवटपर्यंत कोणासच पत्ता लागला नाहीं. तो स्वदेशीं परत आला नाहीं व शत्रुसैन्याच्याहि हातीं लागला नाहीं यावरून तो धारातीर्थींच मरण पावला असावा असा निष्कर्ष बहुतेकांनीं काढिला. परंतु कित्येक श्रद्धाळू लोक असें मानूं लागले कीं भाऊसाहेबाचा कांहींच मागमूस ज्याअर्थीं कोठें लागत नाहीं त्याअर्थीं तो कोठें तरी अज्ञातवासांत काल कंठित असावा व पराभवाच्यायोगें झालेल्या मानखंडनेमुळें स्वकीयांना तोंड दाखविण्याचें टाळीत असावा. त्याची पत्नी पार्वतीबाई हिचाहि ह्या कल्पनेवर विश्वास होता; व त्यानुसार ती स्वतःला सुवासिनी मानून सारे सौभाग्यालंकार धारण करीत असे. या तिच्या समजाला पूरक अशी एक घटना १७६४ च्या सुमाराला घडली. सदाशिवरावभाऊशीं बरेंच साम्य असलेल्या एका इसमास दौलतगीर नांवाचा एक मराठा सरदार उत्तर हिंदुस्थानांतून घेऊन आला व हेच ते आपले हरवलेले भाऊसाहेब पेशवे असें सर्वांना सांगूं लागला. तो भाऊसाहेब नसल्याची त्या वेळच्या कारभारी मंडळाची खात्री झाल्यानें त्यांनीं त्यास पकडिलें व गुन्हेगार ठरवून तोफेच्या तोंडीं देण्याचें ठरविलें; परंतु पार्वतीबाईच्या आग्रहामुळें त्याला ठार न मारितां रत्नागिरीच्या किल्ल्यावर बंदिवासांत ठेवण्यांत आलें. रामचंद्र नाईक नांवाच्या एका विश्वासू सरदारास त्याच्या बंदोबस्ताकरितां म्हणून तेथें नेमिण्यांत आलें. यानंतर नारायणरावाचा खून, राघोबानें माजविलेला गृहकलह, बारभाईंचें कारस्थान वगैरे प्रचंड घडामोडींत एक तप केव्हां निघून गेलें याचा कोणासच पत्ता लागला नाहीं. राघोबा व इतर स्वकीय व परकीय शत्रू या सर्वांना नामोहरम करून नानानें शिंदे, फडके वगैरे सरदारांच्या मदतीनें सवाई माधवरावाची पेशवा म्हणून स्थापना केली व स्वतःच्या हातांत राज्यकारभाराचीं सर्व सूत्रें घेतलीं. मुत्सद्देगिरी व कडक शिस्त याच्या जोरावर त्यानें मराठी राज्याची घडी जवळजवळ पूर्ववत् बसवीत आणिली होती. या साऱ्या घडामोडी चालू

असतांना तोतया म्हणून ठरल्या गेलेल्या इसमास आपल्या नजरेस एकदां तरी घालावें अशी इच्छा पार्वतीबाईनें अनेकदां प्रगट केली होती; परंतु तिकडे आतां-पर्यंत साऱ्यांनींच डोळेझांक करण्याचें धोरण बुद्धिपुरःसर पत्करिलें होतें. पार्वती-बाईनेंहि वैतागून शेवटीं नानाशीं या बाबतींत जरा अबोलाच पत्करिला होता. असें दर्शनी कां होईना पण सर्व वातावरण ठाकठीक असतांना एके दिवशीं अचानकपणें बातमी आली कीं, रामचंद्र नाईकानें कैदेंतील इसम सदाशिवरावभाऊच आहे अशी खात्री झाल्यानें त्यास आपल्या अधिकारांत मुक्त केलें आहे, एवढेंच नव्हे तर बराच मोठा फौजफाटा घेऊन तोतया पुण्यापासून अवघ्या आठ कोसां-वर येऊन पोहोंचला आहे. नाना ही बातमी ऐकतांच चकित झाला, पण खचला नाहीं. त्यानें तावडतोब त्याचा अत्यंत विश्वासाचा असा जो सरदार हरिपंत फडके त्यास बोलावून घेऊन प्रतिकाराची जय्यत तयारी केली. त्या तयारीची हकिगत कथारंभींच्या संवादांत आलेलीच आहे.

हरिपंत गेल्यावर मात्र नाना फारच उदास झाला. तो अस्वस्थपणानें महालांत फेऱ्या घालूं लागला. तोतयाच्या आक्रमणामुळें तो बिलकुल उदास वा अस्वस्थ झाला नव्हता. या सर्व प्रकरणांत पार्वतीबाईसारख्या साध्वीच्या मनाला किती यातना होतील याच कल्पनेनें तो बेचैन झाला होता. त्यानें स्वतः पार्वतीबाईची या बाबतींत कितीतरी वेळां समजूत घालण्याचा प्रयत्न केला होता; परंतु तोतयाला स्वतः पहाण्याचा तिचा हट्ट कांहीं केल्या ती सोडीना. नानानें वास्तविक पहातां त्या गोष्टीलाहि विरोध केला नसता; परंतु अलीकडे चार पांच वर्षे पार्वतीबाईला भ्रमाचे झटके येत असत; आणि त्या वेळीं जणुं सदाशिवरावभाऊच आपल्या समोर उभा आहे असें समजून ती मोठमोठ्यानें बेभान होऊन बोलूं लागे. तोतयाला नजरेखालून घालीत असतां पार्वतीबाईला असा भ्रमाचा झटका आला तर काय आपत्ति ओढवेल याची नानाला चांगलीच कल्पना होती; आणि म्हणूनच तो या ना त्या निमित्तानें तो प्रसंग टाळीत होता. परंतु तोतयाच्या आक्रमणामुळें आतां साऱ्या प्रकरणाला अगदीं वेगळीच कलाटणी मिळाली होती. तोतयाचें आक्रमण आपण हां हां म्हणतां परतवून

लावूं याची त्याला पूर्ण खात्री होती; परंतु त्यामुळेंच पुन्हां पार्वतीबाईच्या गैर-विश्वासाचे मात्र आपण धनी होणार या जाणिवेनें त्याच्या पोटांत अगदीं तुटे. ज्या सदाशिरावभाऊंना तो पितृतुल्य मानी त्याच्याच पत्नीनें त्याच्याबद्दल गैर समजापोटीं कां होईना शत्रुभाव मानावा या चमत्कारिक योगायोगाचें त्याला राहून राहून वाईट वाटे! तो या अशा उदास मनःस्थितींत असतांनाच त्याला पार्वतीबाईकडील भेटायला येण्याबद्दलचा निरोप हुजऱ्यामें येऊन कळविला. तो निरोप ऐकून तो आणखीच बेचैन झाला. पार्वतीबाईकडे जावयाचें म्हणजे त्याला अलीकडे अगदीं महासंकट वाटे; कारण तेथें गेल्यावर ती जें खोंचून टोंचून बोले तें सारें त्याला सहन करावें लागे. त्या वेळीं तो जर आपल्या म्हणण्याच्या समर्थनार्थ कांहीं बोलूं लागला तर ती त्याचा अगदीं विपर्यास करी! परंतु असें असलें तरी त्याला बोलाविणें आल्यावर जाणें भागच होतें. ताबडतोब कपडे करून तो शनिवारवाड्याकडे निघाला. पार्वतीबाईच्या महालापाशीं तो येऊन पोहोंचला तेव्हां आंत कोणीतरी बोलत असल्याचें ऐकू आलें. म्हणून तो दारांतच किंचित थबकला. तेवढ्यांतच पार्वतीबाईचीं पुढील वाक्यें त्याच्या कानावर पडलीं. "नाईक, तुमच्यासारखा निश्चयी स्वामिभक्त किल्लेदार रत्नागिरीला नसता तर आज इतक्या वर्षांनी तरी स्वारीच्या पायांतली बिडी निघाली तीहि निघाली नसती! तुमचे माझ्यावर किती उपकार झाले म्हणून सांगूं? तुम्हीं मला चुडादान दिलंत. मी खरोखरीच तुमच्या पायांवर डोईच ठेवली पाहिजे."

नाना आंत गेले तेव्हां त्यांना एक अत्यंत उद्वेगजनक दृश्य दिसलें. रत्नागिरीचा वृद्ध किल्लेदार रामचंद्र नाईक याला वांकून नमस्कार करण्याच्या बेतांत असलेली पार्वतीबाई त्याला दिसली. नानाला अचानकपणें आंत आलेला पहातांच ती किंचित चपापलीच. नाईकानें नानांना वांकून मुजरा केला पण त्याचा नानांनीं स्वीकार नाहीं; त्याच्याकडे तिरस्कारानें पहात नाना म्हणाले, "कोण नाईक? तुम्ही पुण्यास केव्हां आलां? तुम्हांला रत्नागिरी सोडायला परवानगी कोणीं दिली?"

नाईक : नाना, सरकार-स्वारीला झाले एवढे क्लेश पुरे झाले, आतां तरी आपली

माया आवरा; दुराग्रह सोडा; आणि श्रीमंतांना बिनबोभाट पुण्याला येऊं द्या.

नाना : नाईक, तुम्हांला शरम नाहीं वाटत असलीं कांगावखोर मायावी भाषणें बोलायला ? तुम्ही तोतयाला कां सोडिलंत याचं आधीं उत्तर द्या.

नाईक : नाना, शेंकडों लोकांनीं समक्ष येऊन खात्री करून घेतली आहे कीं ते सदाशिवरावभाऊच आहेत म्हणून. आणि एके दिवशीं तर निराशेनें निर्वाणीचे शब्द बोलून भाऊसाहेबांनीं तुरुंगाच्या दगडावर डोकं फोडून घेण्याचा आणि किल्यावरून समुद्रांत उडी टाकण्याचा प्रयत्न केला, तेव्हां मग मीं मनाशीं निर्धार केला कीं, हातून आपलीच काय गुन्हेगारी होईल ती होवो; पण सरकार स्वारीला यापुढं बंदिवासांत ठेवणं हें ईश्वराच्या घरीं पाप होईल—म्हणून मग आज्ञेचं उलंघन मोठ्या कष्टानं केलं !

नाना : मग बारा वर्षांपूर्वीं तोतया प्रथम रत्नागिरीस तुमच्या कैदेंत आला तेव्हांच त्याला ओळखून तुम्हीं त्याच्या पायांतल्या बिड्या कां नाहीं काढल्या ?

नाईक : माझी एकदम खात्री होईना ! शिवाय सरकारचा हुकूम तोडायला मन घेईना !

नाना : पण आतां खात्री झाली ती केवळ लोकांच्या सांगण्यावरूनच कीं नाहीं ? आणि पूर्वीं आमचा हुकूम तोडायला तुमची छाती होत नव्हती ती आतां झाली, याचा अर्थ, दुसऱ्या कोणाचं तरी तुम्हांला पाठबळ मिळालं आहे म्हणून, असाच कीं नाहीं ?

पार्वती : नाना, मला तुमच्या राजकारणांत पडायचं नाहीं. पण तिकडच्या पायांतल्या बिड्या काढायला रामचंद्र नाइकांना माझं पाठबळ मिळालं, असं जर तुमच्या म्हणण्याचा रोख असेल तर तो मात्र बरोबर नाहीं, एवढंच मी सांगतें.

नाना : बाईसाहेब, नाइकांना आपलं पाठबळ मिळालं असं मी मुळींच म्हणत नाहीं. त्यांना पाठबळ मिळालं आहे तें आमच्या शत्रूचं ! हैदरखान, करवीरकर, मोरोबा आणि दादासाहेब इतक्यांच्या जोरावर जेव्हां दौलतगिरानं तळी उचलली, तेव्हां नाइकांना दयेचा पान्हा फुटला, हें आपणहि लक्षांत घेतलं पाहिजे ! नाइकांनीं आरंभिलेला हा सर्व खेळ बंडाचा आहे ! दयाधर्माचं हें निव्वळ सोंग-

ढोंग आहे. नाईक, किल्लेदार नेमतात ते हुकुमाची तामिली करायला नेमतात. दयाधर्माची नसती उठाठेव करायला नेमीत नाहींत. तोतया कांहीं आजकालचा कैदी नाहीं. आज बारा वर्षे कैदेंत आहे. या अवधींत या कृत्याच्या पापपुण्याचा भार ज्यांनीं आपल्या माथ्यावर वाहिला ते तो यापुढंहि वाहायला समर्थ आहेत समजलां ? शेषाचा भार हलका करायला सरड्यानें धांवण्याचं कारण नाहीं. लांडि कारभार करून त्यांना मोठं प्रतिष्ठित नांव दिल्यानं गुन्हेगारी कमी होत नसते, उलट ती वाढते मात्र. समजलां नाईक ? तोतयाला मोकळा सोडून, कोकणांत बंड उभारून, आपण होऊन इकडं आल्यानं तुमच्या धाडसी सत्यप्रियतेचा पगडा माझ्यावर बसेल अशी जर तुमची समजूत असेल तर ती मात्र चुकीची आहे. पहा याची प्रचीति आत्तांच ! कोण आहेरे बाहेर ? चला, आंत या. पकडा या हरामखोराला !"

निमिषार्धांत शिपाई आंत आले व नाईकाला गिरफदार करून घेऊन गेले. ते गेल्यावर नाना पार्वतीबाईकडे वळून म्हणाला, " बाईसाहेब, हा प्रकार आपल्या डोळ्यापुढं व्हावा याबद्दल मला फार वाईट वाटतं. गोष्टी या थराला आल्या तेव्हां आज थोडंसं या बाबतींत आपल्याशीं बोलण्याचा मी निश्चय केला आहे. आपली परवानगी असेल तर बोलतों.

पार्वती : नाना, खुशाल बोला ! त्याला माझी परवानगी कशाला पाहिजे ? आणि परवानगी देणारी मी कोण ? माझ्या भेटीला आलेल्या नाइकांना खुद्द माझ्या दिवाणखान्यांत तुम्हीं हातकड्या पायकड्या घातल्या, त्याला जर तुम्हांला माझी परवानगी लागली नाहीं, तर मला दोन अधिक उणीं उत्तरं तुमच्या मनांत बोलायचीं असलीं तर त्याला माझ्या परवानगीची वाट थोडीच पहावी लागणार आहे ?

नाना : आपले हे शब्द काळजाला कसे घरे पाडतात, तें काय सांगूं ? शिव शिव ! बाईसाहेब ! खरेखुरे भाऊसाहेब जिवंत असते तर ते मला नकोसे का होते ? मी अधिकाराची क्षुद्र हांव धरून ठेवतों आहे असं का आपल्या मनांत येतं ? हा नाना इतका नीच अधम झाला काय ? मी लहान असतांना पोटच्या

मुलाप्रमाणं माझ्यावर प्रेम कोणीं केलं ? भाऊसाहेबांनींच ना ? मला माधवराव-साहेबांबरोबर आस्थेनं शिक्षण कोणीं दिलं ? पानपतच्या संग्रामांत विश्वासराव ठार झाले, तेव्हां हत्तीवरून उतरून घोड्याच्या रिकीबींत पाय ठेवतांना 'नाना मी चाललों ! आतां तूंच सांभाळ !' अशी दुःखपूर्ण आरोळी कोणी मारली ? भाऊसाहेबांनींच ना ? पित्यासमान व गुरुसमान असणाऱ्या त्या माझ्या धन्याला कैदेंत टाकण्याइतका मी नीच, हरामखोर आहें काय ?

पार्वती : नाना, तुमचे शब्द मला पटतात. पण मी तरी काय करूं ? स्वारी जिवंत आहे अशीं स्वप्नं मला कां पडतात ? जो कोणी अतिथि–अभ्यागत, गोसावी, बैरागी भेटतो तो माझ्या आशेच्या अंकुरावर प्रेमपूर्ण शब्दांच्या अमृताचं सिंचन कां करितो ?

नाना : बाईसाहेब, असल्या आशीर्वादावर जाणं व्यवहाराला धरून नाहीं. आपल्या दुःखपूर्ण मुद्रेकडे पाहून, विशेषतः आपणां स्वतःला आशा वाटते म्हणून–गोड बोलणारेच पुष्कळ !

पार्वती : पण नाना तुमची जर स्वतःची येवढी खात्री आहे तर—तर आतां स्पष्टच विचारतें—ज्याला तुम्ही तोतया म्हणून संबोधतां तो माझ्या दृष्टीखालीं घालायचें कां टाळतां ?

नाना : आपण म्हणतां तें खरं आहे. पण–पण—

पार्वती : गेलीं बारा वर्षे या 'पण' आणि 'परंतु' त घालवलींत तीं नाना, अजून पुरे झालीं नाहींत काय ? माधवरावानं, नारायणानं, रघुनाथरावांनीं जशी इतके दिवस माझ्या मागणीची उपेक्षा केली तशीच तुम्ही करणार ना ? तोतयाला माझ्या नजरेला एकदां घालून साऱ्या संशयाचं मूळच उपटून टाकण्याचं तुम्हो कां टाळीतां आहां ?

नाना : बाईसाहेब, माझी इच्छा असली तरी तें आतां हातीं राहिलेलें नाहीं. आतां लढाईपर्यंत मजल आलेली आहे. बोरघाटांत लवकरच लढाई जुंपेल असा रंग दिसतो. तोतयाचा जय होऊन तो आपल्या पायानं पुण्याला आला तर

पार्वती : आणि तुमचा जय झाला तर–?

नाना : तर मी परमेश्वरस्मरण करून वचन देतों कीं, माझा स्वतःचा अभिप्राय बाजूला सारून, मी प्रथम त्याला आपल्या नजरेला घालीन आणि मगच त्याचं काय पारिपत्य व्हायचं असेल तें होईल.

पार्वती : ऋणानुबंध असेल तसं घडेल !

नाना : बरं, मी येतों आतां.

नाना निघून गेले. पार्वतीबाई जड पावलांनीं देवघराकडे निघाली. लक्ष बिल्वदळांचा संकल्प तिला पुरा करावयाचा होता. नियमाप्रमाणें बगंभट बेलाचीं बिल्वदळें खुडीत तिची वाट पहात बसलेच होते. पार्वतीबाई येतांच त्यांनीं संकल्प सांगण्यास प्रारंभ केला. लक्ष वहाणें चालू होतें तरीहि पार्वतीबाईचें लक्ष पूजेकडे लागेना. तिच्या डोळ्यापुढें सदाशिवाच्या पिंडीऐवजी सदाशिवरावभाऊंचीच मूर्ति सारखी येत होती. आपण ज्याला पति समजत आहोंत तो पुण्यापासून अवघ्या आठ कोसांवर असतांहि आपल्याला त्याचें दर्शन दुर्लभ व्हावें या दुर्दैवाच्या जाणीवनें तिच्या डोळयांतून, समोरच्या पिंडीवरील अभिषेकपात्राप्रमाणेंच पाण्याची संतत धार चालू होती. तिनें मध्येंच एकदम भटजींना विचारलें, "भटजी, यांना औरंगाबादेस प्रथम कैद करण्यांत आलं त्याला आज किती दिवस झाले बरं–?"

बगंभट : दिवस कसले—चांगलीं बारा वर्षें झालीं कीं !–पण जाऊंदे बाईसाहेब, कशाला त्या आठवणी आतां ? परमेश्वरानेंच जिथें डोळे मिटले आहेत तिथें–

पार्वती : नाहीं, नाहीं, भटजी. परमेश्वर नाहीं बरं कधीं डोळे मिटायचा.

बगंभट : बाकी तसंहि वाटण्याजोग्या बातम्या अलिकडे येऊं लागल्या आहेत !

पार्वती : तुम्ही कोणती बातमी ऐकलीत भटजी ?

बगंभट : तुमच्या त्या बिठा दासीची–काल रात्रींची– ?

पार्वती : अन् ती काय बाई ?

बगंभट : काल म्हणे रात्रींच्या वेळीं तिचा नवरा घरीं आलेला दिसला !–तो हैबती हुजऱ्या–?

पार्वती : पण तो पानपतच्या लढाईंत मारला गेला ना म्हणे ?

बगंभट : हो कोणी तसंहि म्हणतात ! पण कदाचित् जगूनवांचून परतहि आला असेल—कोणी सांगावें ?

पार्वती : मग इतक्या दिवस कुठं होता तो— ?

बगंभट : कदाचित आपण 'तोतये' मानले जाऊन कैदेंत पडूं या भीतीनें आजपावेतों मुद्दामच प्रगट झाला नसेल !— बाकी बाईसाहेब ही बातमी तर मला अगदीं शुभशकुनासारखी वाटते !— कदाचित असेंहि नसेल ना कीं आठ कोसांवर येऊन पोंचलेल्या भाऊसाहेबांनीं मुद्दामच आपल्या हुजऱ्याला बातमी काढण्याकरितां म्हणून पाठविला असावा ?

पार्वती : काय सांगावं ? पण भटजी आपण या अशा कल्पनेच्या वावड्या आणखी किती दिवस उडवीत राहायचें ? वस्तुस्थिति कळण्याच्या दृष्टीनें कांहीं उपाय नाहीं का सुचत तुम्हांला ?

बगंभट : मला एकच तोड सुचते आहे या बाबतींत; आणि ती म्हणजे मीच स्वतः भाऊसाहेबांच्या गोटांत जाऊन त्यांची समक्ष गांठ घेतों !

पार्वती : अहाहा, भटजी ! ही बरीक मात्र तुम्हीं चांगली तोड काढली. तुम्हीं आतांच निघण्याची तयारी करा.

बगंभट : बाईसाहेब, तयारी कसली करायची आहे मला ? मला भिक्षुकाला काय— दोन पंचे नि एक आसन; फार तर देवाची संबळी पडशींत खुपसली कीं झालं. तें मी आतां घेऊन येतों सारं !

पार्वती : या या—तोंवर मी एक स्वारीला द्यायचें पत्र आणि कांहीं जिन्नस तयार करून ठेवतें.

बगंभटाची स्वारी घाईघाईनें शनवारवाड्याबाहेर पडली. तो बाहेर पडल्यावर कांहीं वेळानें आणखीहि एक व्यक्ति वाड्यांतून बाहेर पडली. ती व्यक्ति झरझर पावलें उचलीत निघाली ती जी एकदम नानावाड्याजवळ येऊन ठेपली. त्या वेळीं नानांची बेलबागेंत दर्शनाला जाण्याची वेळ झालेली होती. दारांत पालखी तयार होती. त्या व्यक्तीनें अगदीं सरावांतल्या माणसाप्रमाणें

दारावरच्या सदू हुजऱ्याबरोबर नानाकडे 'भेट घेण्याची इच्छा असल्याबद्दल' निरोप पाठविला. कांहीं वेळानें आंतून होकारार्थी निरोप आल्यावर त्या व्यक्तीला घेऊन सदू नानांच्या दिवाणखान्यांत गेला. नाना दिसतांच मोठ्या अदबीनें दरबारी पद्धतीचा मुजरा करीत ती व्यक्ती त्यांना म्हणाली, "खाविंदांनीं कसूर माफ करावी. पण मला थोडं एकान्तांत कांहीं सांगायचं आहे."

नाना : सदू, जा जरा तूं बाहेर, पण हांक मारतांच येशील इतका जवळ उभा रहा. ठीक आहे. आतां एकान्त आहे. तूं निःशंकपणानें बोल. कोण तूं? तुला कुठंतरी पाहिलं असावं असं वाटतं!

व्यक्ति : सरकार कसूर माफ. मी हैबती निंबाळकर आहें.

नाना : अरे खरंच कीं! हैबती किती थकलास रे? मी तर तुला अगदीं ओळखलं नाहीं. पानपतच्या संग्रामांत भाऊसाहेब घोड्यावर स्वार होऊन गर्दींत शिरले तेव्हां आमच्या समक्ष दुसऱ्या एका घोड्यावर उडी मारून त्यांच्याबरोबर ज्यानं स्वामिभक्तीनें त्याच गर्दींत उडी घातली तोच तूं हैबती ना?

हैबती : होय सरकार! तोच हा दुर्दैवी हैबती!

नाना : हैबती, तूं स्वतःला दुर्दैवी कां बरं म्हणून घेतोस?

हैबती : कारण भाऊसाहेबांचा घात शत्रूच्या हातून झालेला मी आपल्या डोळ्यांनीं पाहिला! मी आधींच जखमी होऊन पडल्यामुळें त्यांच्या बचावार्थ मला कांहींहि करतां आलें नाहीं. ते स्वर्गाला गेले आणि मी मात्र हतभागी ती बातमी सांगायला इथें आलों!

नाना : कायरे, तुला पार्वतीबाईसाहेब ओळखतील का?

हैबती : कदाचित् ओळखतीलहि!—परंतु, कसूर माफ असावी—मी सध्यां त्यांना न भेटलेलंच बरं!

नाना : काय? तूं पार्वतीबाईंना भेटूं इच्छित नाहींस!

हैबती : नाहीं सरकार. कारण भाऊसाहेबांच्या मृत्यूची हकीगत त्यांना सांगितली तरी तिजवर त्यांचा विश्वास बसणार नाहीं अशी माझी खात्री आहे. उलट कदाचित् त्यांना मात्र वाटेल कीं हें आपलंच कांहींतरी कारस्थान असेल! तरी पण

सरकार, या कार्यांत सध्यां एक आपली अल्पशी सेवा करण्याची इच्छा आहे. येथें येण्यापूर्वी मी शनवारवाड्यांत गेलों होतों. बाईसाहेबांची गांठ घेण्याकरितां म्हणून त्यांच्या महालांत जाणार होतों तोंच आंत कोणीतरी बोलत आहे असें ऐकूं आल्यानें दारांतच जरा थबकलें. आंतील संभाषणावरून मला अशी महत्त्वाची बातमी कळली कीं बाईसाहेब त्यांचा पुजारी बगंभट याच्या मार्फत एक पत्र व कांहीं जिन्नस तोतयाकडे पाठविण्याचा बेत करीत आहेत. तें ऐकतांच मी त्यांना भेटण्याचा विचार रद्द केला व तडक आपणाकडे आलों. आपली आज्ञा असेल तर बगंभटाच्या पाठोपाठ जाऊन त्याला आडवाटेंत गांठतों व तें पत्र, वस्तू त्याच्याजवळून हिरावून घेऊन त्या तोतयाकडे जातों व त्याची वित्तंबातमी काढून आपल्याला ती सारी कळवतों.

नाना : हैबती तूं जितका इमानी तितकाच कारस्थानीहि आहेस हं! हें काम तूं जरूर कर. योग्य वेळीं तुझ्या श्रमांचें चीज होईल याबद्दल निःशंक अस

हैबती निघून गेल्यावर नानासाहेब बाहेर पडण्याच्या बेतांत होते परंतु तेंव-ढ्यांत सदू हुजऱ्या पुन्हां आंत आला व म्हणाला, "सरकार, बाहेर एक जोगीण रडत उभी आहे. आपल्याला एक अर्ज द्यावयाचा आहे असें म्हणते." नानांनीं त्या बाईला घेऊन येण्याबद्दल त्याला आज्ञा केली. कांहीं वेळानें एका शुभ्र वेषधारी जोगिणीला घेऊन सदू आंत आला. तिच्या पेहेरावावरून ती उत्तर हिंदुस्थानाकडील दिसत होती.

नाना : माताजी, काय नांव आपलं?

जोगीण : मला अमला म्हणतात. महाराज, आपलं नांव मी उत्तर हिंदुस्थाना-पासून ऐकून राहिलें आहे. आपण दक्षिणेंतील बिरबल, आपण चतुर न्यायाधीश, अनाथांचे वाली—अशी आपली कीर्ति ऐकून मी आपलं नांव घेत घेत आलें.

नाना : माताजी तें असो, पण आपलं म्हणणं काय आहे तें नाहीं सांगितलंत अजून—?

अमला : महाराज, माझे पति घर सोडून दक्षिणेंत आले आहेत. मी त्यांच्या

शोधार्थ पुष्कळ हिंडलें पण पत्ता लागेना तेव्हां आपली गांठ घेऊन या बाबतींत आपल्या साहाय्याची याचना करण्याचें ठरवून येथें आलें आहें.

नाना : माताजी, तुमची जात कोण ?

अमला : कनोजी ब्राह्मण.

नाना : तुमच्या पतीचें नांव काय ?

अमला : सुखनिधान.

नाना : तुमच्या पतीला गुप्त होऊन किती वर्षं झालीं ?

अमला : बारा वर्षं झालीं असतील.

नाना : त्यांचा इकडे येण्याचा पूर्वीपासूनचा बेत होता कीं ते एकाएकीं गुप्त झाले ?

अमला : ते गुप्त होण्यापूर्वी कांहीं दिवस त्यांच्याकडे दौलतगीर नांवाचा एक दक्षिणी इसम व आणखी कांहीं मराठा मंडळी येत असत आणि त्यांचीं रात्ररात्र कांहींतरी गुप्त खलबतं चालत !

नाना : अस्सं ! माताजी, परमेश्वराचा संकेत कांहीं कळत नाहीं. पण मी तुमचा पति शोधून काढूं शकेन असें मला वाटतं. सध्यां मी सांगतों त्याप्रमाणें करा. सदू, जा या बाईना घेऊन पार्वतीबाईसाहेबांकडे आणि त्यांना म्हणावं कीं, उत्तर हिंदुस्थानाकडून फिरत आलेली जोगीण भजनं चांगलीं म्हणते. ठेवून घ्यावी. बाकीच्या मजकुराचं पत्र मी पुरंदरावरनं पाठवीन, असं सांग. जा. माताजी तुम्ही आतां निष्काळजी रहा. याच्याबरोबर वाड्यांत जा आणि तिथं सुखानं रहा. इतकीं वर्षं पतीचा शोध करण्यांत घालविलींत तसे आणखीहि थोडे दिवस कसे तरी काढा. ”

या प्रकारानंतर अवघ्या चौथ्या दिवशींच तोतयाच्या सैन्याची पार धुळदाण उडाल्याचें वृत्त आलें. ज्यांच्या जिवावर तो उड्या मारीत होता ते सरदार व बाजारबुणगें सैन्य चौफेर उधळलें गेलें. तोतयानेंहि त्या गोंधळांत पळून जाण्याचा प्रयत्न केला परंतु त्याच्या मागावर आधींपासूनच असलेल्या हैबती निंबाळकराच्या चातुर्यामुळें तो पकडला गेला. त्याला गिरफदार करून

पुण्यांत आणण्यांत आलें. पुण्याच्या मंडळींनीं त्याला अजून पाहिलें नव्हतें. कारण बारावर्षांपूर्वी त्याला औरंगाबादेस पकडून तेथून परस्पर रत्नागिरीच्या किल्ल्यावर नेण्यांत आलें होतें. त्यामुळें कांहीं निवडक कारभारी मंडळींखेरीज त्याला कोणीच पाहिलें नव्हतें. त्याला पुण्याला आणितांच मुद्दाम नानानें त्याला बऱ्याच मंडळींच्या दृष्टीखालीं घातला व तो सदाशिवरावभाऊ नसून तोतयाच असल्याबद्दल सर्वांची खात्री करविली. परंतु मुख्य प्रश्न होता तो पार्वतीबाई-बाबतचा ! तिच्या दृष्टीस तोतया कोणत्या पद्धतीनें घालावा या चिंतेंत नाना होता. कारण एक तर एवढ्या मोठ्या खानदान स्त्रीच्या चारित्र्याला कलंकित करण्याच्या बुद्धीनें आलेल्या त्या नीच इसमास तिच्या नजरेस घालण्यासहि त्याला कमालीचा संकोच वाटूं लागला; व दुसरें असें कीं ऐनवेळीं तिला भ्रमाचा झटका येऊन त्या भरांत तो आपला पतीच असल्याबद्दलचा दुराग्रह तिनें धरिला तर त्या आपत्तींतून मार्ग कसा काढावयाचा ? परंतु पार्वतीबाईला त्यानें वचन दिलेलें असल्यामुळें तोतया तिच्या नजरेखालीं घालणें त्याला भाग होतें.

शेवटीं एके दिवशीं नानांनीं कोणालाहि न कळवितां तोतयाला शनवारवाड्यांत आणिलें पार्वतीबाईनाहि त्यानें कांहीं कळविलें नव्हतें. त्यांच्या कानावर त्यानें एवढेंच घातलें होतें कीं, " आज अमलेला तिच्या पतीचें दर्शन मी आपल्या महालांत घडविणार आहें. पण तिला तुम्हीं यांतलें कांहीं सांगूं नका. आपण तिला चकीत करूं ! " त्याप्रमाणें पार्वतीबाई व स्वतः नाना दिवाणखान्यांतलें सारें जेथून दिसेल अशा एका कनातीआड उभे राहिले व त्यांनीं अमलेला दिवाणखान्याच्या मध्यभागीं बसवून तेथें त्या तोतयाला आणविलें. अमलेला पहातांच तोतया कमालीचा दचकला. अमलेनें तो आपला पति सुखनिधानच असल्याचें तत्काळ ओळखिलें. तिला न ओळखिल्यासारखा आविर्भाव करीत सुखनिधान म्हणाला, " तूं—तूं— कोण तूं ? "

अमला : महाराज, मी आपली प्रिय पत्नी अमला, आपण मला ओळखलं नाहीं ?

सुखनिधान : अमला ! अमला ! आणि तूं या वेळीं इकडे कुणीकडं ?

अमला : महाराज, आपल्या शोधाला !

सुखनिधान : पण चांडाळणी, तुला या ठिकाणीं या वेळीं कुणीं बोलावलं ?

अमला : महाराज, मी आपणांकरितां सर्व दक्षिण धुंडाळली. अखेर या पुण्याला आपला पत्ता लागला ! माझी इतके दिवसांची तपश्चर्या सफळ झाली. महाराज, चला, आजच्या आज पुणं सोडून आपण परत मथुरेस जाऊं.

सुखनिधान : चूप रहा, चांडाळणी ! मथुरेशीं माझा यापुढं काय संबंध ? जा आलीस तशी परत जा. फिरून या तोंडानं मी तुझा नवरा आहे असं म्हणूंहि नकोस. तुझी माझी ओळख नाहीं. तूं कोण ? मी कोण ?

अमला : पण महाराज आपण असें कां बोलतां ?

सुखनिधान : अग चांडाळणी, मथुरेंतून निघून मी इकडे आलों—तो तुझ्या करितां नव्हे ! राज्यसुखाच्या आशेनं गेलीं बारा वर्षे जें खडतर दुःख सोसलें त्या साऱ्यावर तूं ऐनवेळीं पाणी ओतणार कीं काय ? अमले, मी तुला फिरून सांगतों कीं मी तुझा नवरा असा तोंडून शब्दहि काढूं नकोस !

अमला : महाराज, हे शब्द ऐकण्यापेक्षां मला मरण कां आलं नाहीं ?

सुखनिधान : तें सुख मात्र तुला आतांच देतों !

असें म्हणून सुखनिधान तिरिमिरीनें पुढें झाला व त्यानें तिचा गळा दोन्ही हातांनीं इतक्या जोरानें दाबला कीं, ती एकदम डोळे पांढरे करून खालींच कोसळली !

कनातीआड उभ्या असलेल्या पार्वतीबाईला या साऱ्या प्रकाराचा अर्थच कळेना. सुखनिधाननें अमलेचा गळा पकडतांच ती एकदम पुढें झाली; परंतु ती येण्यापूर्वींच अमला खालीं कोसळलीहि होती. तिनें नानांना विचारिलें, " नाना, हा काय प्रकार आहे ? हा अमलेचा पति सुखनिधान ना ? "

नाना : होय बाईसाहेब, आणि हाच तो तोतया. ज्यानं इतके दिवस आपणांला दुःख दिलं आणि माझं व्यर्थ रक्त आटवलें, तोच हा दुष्ट अधम !

पार्वतीबाई : हाय हाय ! नाना, मी तुम्हांला व्यर्थ छळलं. मी तुमची क्षमा मागतें. देवा, माझी जन्माची निराशा झाली.



## प्रकरण....७ वें ★ ★

१८४३ सालीं प्रसिद्ध झालेल्या विष्णुदास भावेकृत 'सीतास्वयंवरा'पासून कृ. प्र. खाडिलकरांच्या 'विद्याहरण' पर्यंतचा (१९१३) मराठी रंगभूमीचा विकास हा संख्या* व गुण ह्या दोन्ही दृष्टींनीं अत्यंत भरभराटीचा व प्रगतिपूर्ण असा दिसतो. ह्या सत्तर वर्षांच्या कालखंडांत विविध प्रकृतीचे व प्रतिभेचे भिन्नभिन्न स्वरूपाचे आविष्कार दाखविणारे अनेक नाटककार होऊन गेले. १८६१ सालीं 'थोरले माधवराव पेशवे' हें स्वतंत्र ऐतिहासिक नाटक व १८६५ सालीं 'जयपाळ' हें अत्यंत वास्तव स्वरूपाचें नाटक—अशीं दोन अभिनव व तत्कालीन मार्गदर्शक अशीं नाटकें श्री. वि. ज. कीर्तने यांनीं लिहिलीं. त्यानंतर विष्णुदास भावे यांच्या पठडींतल्या 'ताकडधोम्' 'अल्लूल्लडुर्र्' पद्धतीच्या नाटकांतून पौराणिक नाटकांचें डोकें वर निघत नाहीं असें पाहून परशुरामतात्या गोडबोले, कृष्णशास्त्री राजवाडे, गणेशशास्त्री लेले वगैरे तत्कालीन विद्वानांनीं कालिदासादि संस्कृत नाटककारांच्या नाटयकृतींची व आगरकर, कानिटकर, केळकर, कोल्हटकर, रानडे, महाजनी, परांजपे, बेलसरे वगैरेंनीं शेक्सपिअर-मोलिअरादि इंग्रज व फ्रेंच नाटककारांच्या नाट्यकृतींचीं मराठींत भाषांतरें वा रूपांतरें करून आपल्या नाटककारांपुढें व प्रेक्षकांपुढें नाटयाचे अभिनव व मार्गदर्शक असे आदर्श ठेविले. प्रा. केळकर यांचें 'त्राटिका', देवलांचें 'मृच्छकटिक' व 'संशयकल्लोळ', 'खाडिलकरांचें 'सवाई माधवरावाचा मृत्यू' ह्या गाजलेल्या नाट्यकृतींचें स्फूर्तिस्थान वर उल्लेख केलेल्या विद्वानांच्या भाषांतर-रूपांतरांतच सांपडण्यासारखें आहे. अण्णा किर्लोस्करांनीं आपल्या नाटकांच्या द्वारें 'स्वकपोलकल्पित कथानक', 'संगीतप्राधान्य' व 'घरगुति सहजता' असलेले संवाद हीं तीन वैशिष्ट्यें मराठी नाट्यसृष्टींत नव्या नवलाईनें आणिलीं. साध्या संवादांतच जिव्हाळा व भावनोत्कटता कशी

---

* महाराष्ट्र वाङ्मयसूचीवरून स. १९१७ अखेर मराठींत एकूण ८५३ नाटकें व प्रहसनें प्रकाशित झाल्याचें आढळतें.

आणावी, नाटकद्वारें मांडावयाचा सामाजिक विचार हा कथानकाशीं एकरूप कसा करावा, संविधानकाच्या सहज विकासाला विदूषकराक्षसादि बाह्य उपाधि न लावतांहि रसपरिपोष कसा करावा हें देवलांनीं आपल्या नाट्यकृतींद्वारें दाखवून दिलें. स्वतंत्र, रहस्यपूर्ण व गुंतागुंतीचीं कथानकें कशीं रचावींत, विनोदी कोटीबाज संवाद कसे लिहावेत, उर्दु नाटकांतल्याप्रमाणें चटकदार उडत्या चाली व विनोदी उपकथानकें नाटकांत कशीं योजावींत हें कोल्हटकरांनीं आपल्या नाविन्यपूर्ण नाटकांच्या द्वारें दाखवून दिलें. नाट्यवस्तूची अत्यंत प्रमाणबद्ध, चित्तवेधक व उदात्त भावनांना नि भव्य घटनांना व देखाव्यांना वाव देणारी अशी रचना कशी करावी, अटीतटीचे प्रसंग निर्माण करून त्यांतून उद्भवणाऱ्या व्यक्तींच्या संवाद व कृती यांच्या द्वारें रेखीव उत्कट स्वभावदर्शन कसें करावें, राजकीय व सामाजिक प्रमेयें पौराणिक नाटकांच्या द्वारें कशीं मांडावींत ह्याचे अगदीं अभिनव असे आदर्श नाट्याचार्य खाडिलकर यांनीं आपल्या नाटकांद्वारें मराठी रंगभूमीवर उभे केले. वासुदेवशास्त्री खरे व न. चिं. केळकर या रसिक व्यासंगी विद्वानांनीं ऐतिहासिक नाटकांत नाटककारानें इतिहासकालीन परिस्थितीशीं, घटनांशीं, व्यक्तींशी व भाषेशीं किती तद्रूप व्हावें ह्याचे कित्ते घेण्यासारखे नमुने आपल्या ऐतिहासिक नाट्यकृतींद्वारें होतकरू नाटककारापुढें मांडलेले होते. तात्पर्य १९१२ च्या सुमाराला नाट्य-वाङ्मयाच्या क्षेत्रांत विविध स्वरूपाचे व प्रगतीचा भावी पल्ला दाखविणारे असे भरपूर आदर्श नाट्यप्रयोग झाले होते. आतां यापुढें आत्तांपर्यंतच्या नाट्या-चार्यांनीं विभागशः दाखविलेल्या निरनिराळ्या नाट्यांगांचें कुशलतेनें संकलन करून नाटकें लिहिणाऱ्या होतकरू नाटककाराची आवश्यकता होती. इ. स. १५९० च्या सुमाराला इंग्रजी नाट्यसृष्टीलाहि अशाच नाटककाराची गरज होती. कारण त्यावेळेपर्यंत निरनिराळ्या नाट्यांगांत अपूर्व असें कौशल्य दाख-विणारे ग्रीन, लिली, किड, मार्लो वगैरे नाटककार जरी होते तरी त्या साऱ्यांच्या अंगीं व्यक्तिशः असलेल्या गुणांना संकलित स्वरूपांत एकत्र आणणाऱ्या कोणा-तरी नव्या उमेदीच्या पण मार्मिक व रसिक अशा नाटककाराची अत्यंत तीव्र-तेनें गरज भासत होती. हें अवघड कार्य अपेक्षेबाहेर यशस्वी करणारा असा

नाटककार सुदैवानें त्यांना त्या वेळीं लाभला. त्याचें नांव वुइल्यम शेक्सपिअर. त्यानें ग्रीनच्या नाटकांतील अद्भुतरम्यता व भावनोत्कटता, लिलीच्या नाटकांतील भाषावैशिष्ट्य, किडच्या नाटकांतील कारुण्यपूर्ण वातावरण, मार्लोच्या नाटकांतील भावनेचा व भाषेचा भडकपणा—हे सर्व गुण संकलित स्वरूपांत आपल्या नाटकांतून आणिले. शेक्सपिअरइतक्या यशस्वीपणें जरी नाहीं तरी कांहीं प्रमाणांत या स्वरूपाचा प्रयत्न यशस्वीपणें करणारा एका होतकरू नाटककार मराठी नाट्यसृष्टीलाहि सुदैवानें लाभला. नाटकें लिहूं लागण्यापूर्वी शेक्सपिअर ज्याप्रमाणें रंगभूमीच्या क्षेत्रांतच तेथील अवांतर उद्योग करून उपजीविका करीत होता व एकीकडे तेथं लाभणाऱ्या यशाचें मर्म शोधीत होता त्याचप्रमाणें हाहि नाटककार 'किर्लोस्कर नाटक मंडळी'त शिक्षकाचें काम करून पोट भरीत होता व एकीकडे किर्लोस्कर, देवल, कोल्हटकर, खाडिलकरादि नाट्याचार्यांच्या नाट्यकृतींचें बारकाईनें अवलोकन व अभ्यास करीत होता. या नाटककाराचें नांव राम गणेश गडकरी हें होय.

किर्लोस्करांच्या नाटकांतील घरगुती वळणाचे संवाद, देवलांच्या नाटकांतील भावनोत्कटता व भाषेंतील जिव्हाळा, कोल्हटकरांच्या नाटकांतिल स्वतंत्र विनोदी उपकथानकें योजण्याची कल्पना व कोटीबाज संवाद, खाडिलकरांच्या नाट्यघटनांतील भव्यता व उदात्तता, खरे-केळकरांच्या नाटकांत इतिहासकालीन घटना व व्यक्तींबाबत आढळून येणारी तद्रूपता—या भिन्नभिन्न स्वरूपाच्या नाट्यगुणांचें संकलन श्री. गडकरी यांनीं आपल्या नाटकांतून मोठ्या कुशलतेनें व मार्मिकतेनें करण्याचा यशस्वी प्रयत्न केला आहे. सत्तर वर्षांच्या कालखंडांतील गाजलेल्या नाट्याचार्यांच्या तपस्येचा आशिर्वाद मस्तकावर घेऊन नाट्यसृष्टींत पाऊल टाकलेल्या या तरुण, व्यासंगी व प्रतिभासंपन्न अशा नाटककारास मराठी रंगभूमीवर अपूर्व असें यश मिळालें यांत नवल काय ?

श्री. गडकरी यांनीं पुढील नाटकें लिहिलेलीं आहेत.

**सामाजिक** : 'प्रेमसंन्यास' (१९१२), 'भावबंधन' (१९१७), 'पुण्यप्रभाव' (१९१७), 'एकच प्याला' (१९१७).

कै. राम गणेश गडकरी



जन्म : १८८५ : मृत्यु : १९१९

**ऐतिहासिक** : ' राजसंन्यास ' ( १९१९ ).

या नाटकांपैकीं ' एकच प्याला ' हें नाटक गडकऱ्यांच्या मृत्युनंतर रंगभूमीवर आलें. दारूच्या दुष्परिणामावर ह्या नाटकाचें कथानक आधारिलेलें आहे. याच विषयावर आधारलेलीं श्री. कृ. कोल्हटकरकृत ' मूकनायक ' ( १९०१ ), कृ. प्र. खाडिलकरकृत ' विद्याहरण ' ( १९१३ ), मीर मुनशी महंमद इस्माईलकृत ' एकच घोट ' ( १९१८ ) हीं नाटकेंहि आहेत. परंतु गडकऱ्यांच्या ' एकच प्याल्या ' शीं तुलना करितां तीं फारच फिकीं वाटतात.

' एकच प्याला ' ह्या नाटकाचा पहिला प्रयोग ता. २० फेब्रुवारी १९१९ रोजीं ' गंधर्व नाटक मंडळी ' नें पुणें येथील किर्लोस्कर थिएटरांत करून दाखविला. हें नाटक गोष्टरूपानें पुढें दिलें आहे.

## एकच प्याला : : . नाटककार

### राम गणेश गडकरी

सुधाकर : चोवीस तास झाले, मस्तकावर नुसते घणाचे घाव बसताहेत. तळिराम, मला कांहीं सुचेनासें झालें आहे.

तळिराम : दादासाहेब, अशा आपत्ति या संसारांत यायच्याच !

सुधाकर : तळिराम, आपत्तींची मी पर्वा करतों असं का तुला वाटतं ? मी कुबेराची संपत्ति लाथेनं झुगारून दिली असती, आणखी पुन्हां हातानं ओढून आणली असती; पण या अपमानाच्या जाचण्या मात्र सहन होत नाहींतरे !

तळिराम : उद्यां चार दिवसांनीं या गोष्टींचा विसर पडून—

सुधाकर : विसर ? ती गोष्टच विसर ! प्राण जाईपर्यंत या अपमानाच्या वेदना अशाच चालू रहाणार !

तळिराम : या तुमच्या दुःखाचा थोडा तरी विसर पडावा अशी तुमची इच्छा असेल तर त्याला एक इलाज आहे ! तुम्ही रागावणार नाहीं ? सांगूं मी तो इलाज ?

सुधाकर : सांग, काय वाटेल तो इलाज सांग !

तळिराम : तुम्ही थोडी दारू घेऊन स्वस्थ पडून रहा.

सुधाकर : काय दारू ? तळिराम—

तळिराम : हो दारु ! इतकं दचकण्याचं कांहीं कारण नाहीं ! व्यसन म्हणून दारु अति भयंकर आणि निंद्य आहे हें मलाहि कबूल आहे. पण आपणांला ती केवळ औषधाकरितां म्हणून घ्यायची आहे आणि तीसुद्धां अगदीं किती— अगदीं थोडी ! एवढीशी घेतल्यानं संवय लागेल अशी नादानपणाची धास्ती आपल्याला वाटायचं कांहीं कारण नाहीं.

सुधाकर : छे, छे ! संवय वगैरेचा बागुलबोवा मला मुळींच वाटत नाहीं ! लौकिक दृष्ट्या सुद्धां माझं मन मला खात्री देत राहील कीं हें कांहीं मी चैनी-खातर करीत नाहीं. सिंधु, रामलाल यांची समजूत—जाऊं देत—जरा आराम खात्रीनं वाटेल ना ?

तळिराम : अगदीं खात्रीनं.

सुधाकर : मग, आण—मी कांहीं अशा दुबळ्या मनाचा नाहीं, कीं मला तिची संवय लागेल. चल, आण—कुठें आहे ती ! या यमयातना घडीभर तरी विसरण्यासाठीं मी वाटेल तें करायला तयार आहें.

तळिराम : मी घेऊनच आलों आहें बरोबर—ही घ्या.

सुधाकर : अरे, उगीच जास्त मात्र भरूं नकोस.

तळिराम : छे, छे, अगदीं थोडी ! ही एवढीच—फक्त एकच प्याला.

आदल्याच दिवशीं सुधाकराची सनद सहा महिन्यापुरती रद्द करण्यांत आली होती. कोर्टांत आपल्या अशिलाचं म्हणणं मांडत असतांना त्याच्या एका मुद्याला मुन्सफानें हरकत घेतली. कायद्याचा काटेकोरपणा राखण्याच्या दृष्टीनें केवळ त्यानें ती हरकत घेतली होती. अशा वेळीं शांतपणानें आपली बाजूच कशी खरी कायदेशीर आहे हें वकिलानें वास्तविक रित्या कोर्टाला समजावून द्यावयाचें असतें. विरोधी मुद्यांच्या कांटेकुंपणांमधूनच वकिलाला नेहमीं प्रवास करावयाचा असतो; व अशा वेळीं मनाची शांती—संयम राखण्यांतच त्याच्या

वकिलीचा सारा कस सामावलेला असतो. तरुण सुधाकराला हा संयम राहिला नाही. तो एकदम चढ्या पट्टींतच बोलूं लागला. त्याच्या युक्तिवादांत (argument) विचारापेक्षां विकाराचेंच प्राबल्य अधिक दिसूं लागलें. वकिलाच्या भूमिकेला अगदीं विसंगत असलेलें हें त्याचें वर्तन पाहून प्रतिवादीकडील लोक व कांहीं प्रतिस्पर्धी वकील मंडळी उपहासानें हंसूं लागली; स्वतः मुन्सफालाहि किंचित् हंसूं आल्यावांचून राहिलें नाहीं. या साऱ्याचा परिणाम सुधाकरावर अगदीं विपरीत झाला. त्याचा सारा सुमार सुटला व तो मुन्सफाला होय नव्हे वाटेल तें बोलूं लागला. मुन्सफानें व कांहीं मित्रमंडळींनीं ह्या अशा बोलण्यानें कोर्टाची बेअदबी होत आहे ह्याची त्याला जाणीव करून देण्याचा प्रयत्न केला. पण संतापानें संयम सुटलेल्या सुधाकरावर त्याचा कांहींच परिणाम होईना. कोणत्याहि परिस्थितींत कोर्टाचा अपमान होऊं देणें हें अनिष्टच; आणि त्यामुळेंच मुन्सफानें सुधाकराची सनद, कोर्टाची बेअदबी केल्याबद्दल सहा महिन्यांपुरती रद्द केली. भर कोर्टांत झालेला हा अपमान मानी सुधाकराच्या मनाला अतिशयच लागून राहिला. त्याचा कारकून तळिराम व मित्रमंडळी यांनीं त्याला कसातरी 'दादा बाबा' करून घरीं आणला. परंतु घरीं आल्यावर तर सुधाकराच्या अंगाचा अगदीं भडकाच उडाला. आपली बुद्धिमत्ता व कायद्याचें अद्ययावत् ज्ञान यांच्या जोरावर त्यानें कांहीं खटल्यांतून अगदीं गाजलेल्या अशा कांहीं वकील-बॅरिस्टरांवर विजय मिळविला होता. त्यानें एकाद्या वादीचें वकीलपत्र घेतलें आहे असें कळल्यावर प्रतिवादीचें वकीलपत्र घेण्यास चांगले चांगले वकीलहि जरा बिचकतच. अगदीं अल्पकाळांत इतकें अपूर्व यश मिळवून कीर्तिशिखराच्या रोखानें भराभर वर चढत जात असलेल्या सुधाकराला कोर्टांतील त्या घटनेमुळें अपमानाच्या—मनोभंगाच्या अगदीं खोल गर्तेंत फेकल्यासारखें झालें. अशा वेळीं त्याचें समाधान करूं शकणारी त्याची पत्नी सिंधु ही आपल्या पहिल्या-वहिल्या बाळंतपणाकरितां नुकतीच माहेरीं गेली होती; त्याला चार उपदेशाच्या गोष्टी सांगून त्याच्या मनोयातनांचा विसर पाडूं शकणारा त्याचा स्नेही रामलाल हा उच्च वैद्यकीय शिक्षणाकरितां दोन दिवसांपूर्वींच विलायतेस रवाना

झाला होता. त्याचा कारकून तळिराम याच्याखेरीज त्याचें सांत्वन करूं शकणारें असें घरांत त्या वेळीं कोणीच नव्हतें. कोर्टांतून घरीं आल्यापासून तब्बल चोवीस तास झाले तरी त्यानें अन्नपाण्याच्या एका कणालाहि स्पर्श केला नव्हता किंवा एक क्षणभरहि त्याला निद्रा येऊं शकली नव्हती. अपमानाच्या वेदना त्याला यमयातनांहूनहि अधिक जाचक वाटत होत्या. या साऱ्या दुःखाचा विसर पडण्याकरितां शेवटीं त्यानें तळिरामाच्या सांगण्यावरून कोणता मार्ग अवलंबिला हें कथारंभींच्या संवादांत आलेलेंच आहे.

सुधाकराच्या मतें त्याचा कारकून तळिराम हा मोठा चलाख, हुशार आणि जिवाला जीव देणारा असा होता. तळिरामाच्या हजरजबाबीपणावर तर तो फारच खूष होता, त्याची बायको गीता हीहि सुधाकराच्याच येथें वरकामाला असे. ती जितकी तोंडाळ तितकीच भोळीभाबडी होती. नवऱ्याच्या व्यसनीपणाबद्दल ती नेहमीं आपल्या मालकिणीजवळ तक्रार करी. परंतु तळिराम आपल्या कामांत अतिशय चोख असल्यामुळें त्याच्या व्यसनीपणाकडे मालक-मालकीणबाई दोघेहि जरा कानाडोळाच करीत. गीता मात्र नवऱ्याच्या व्यसनाला कमालीची कंटाळली होती. घरांतले सारे दागदागिने, सामानसुमान तळिरामानें दारुपायीं विकून टाकले होते. आणि ह्याबद्दल त्याच्या मनाला काहीचेंहि वाईट वाटत नसे. गीतेनें मोलमजुरीनें मिळवून आणलेले पैसेहि तो तिच्याजवळून सत्तेनें काढून घेई. कांहीं सुशिक्षित व्यसनी मंडळींच्या सहकार्यानें ‘ आर्यमदिरामंडळ ’ नांवाची एक मद्यपानाची संस्थाहि त्यानें अलिकडे स्थापन केली होती. त्या संस्थेची वर्गणी भरण्याकरितां तो बायकोला ‘ घरांत कांहीं आहे का ? ’ असें विचारीत होता.

गीता : घरांत आतां तुम्ही नी मी, दोघं बाकी आहों ! या दारुपायीं सारे दाग-दागिने तर तुम्ही विकलेतच ! मी म्हणतें, तें मेलं असो, पण घरांतलं सगळं सगळं सामान सुद्धां कसं विकलंत ?

तळिराम : हः ! त्यांत काय अवघड होतं एवढं ! निम्मं सामान विकलं म्हणून गरीब होत चाललों, आणि पुढं गरीब होत चाललों म्हणून बाकीचं निम्मं सामान विकलं

गीता : चांगला लिहावयाचा नाद होता; पण सारीं पुस्तकं सुद्धां विकलींत !

तळिराम : तुला दूरदर्शित्व नाहीं ! हलींचं युग विद्यादानाचं आहे समजलीस. भर किंमतीला घेतलेलीं पुस्तकं गरजवंत वाचकांना पडत्या भावानं देणं यगला वाईट कोण म्हणेल ?

गीता : तोंडावर तर सरस्वती बसली आहे तुमच्या ! तसबिरीसुद्धां घरांत ठेविल्या नाहींत. अहो, जन्मदात्या वडिलांची तसबीर, पण तीसुद्धां चार आण्यांला विकलींत !

तळिराम : मग यांत वडिलांचा नांवलौकिक वाढला की कमी झाला ? अग, आजकाल बाजारांत, शिवाजी-बाजीसारख्या महात्म्यांच्या, फार काय, देवादिकांच्या सुद्धां तसबिरी दोन आण्याला मिळतात. त्यांच्यापेक्षां आमचे वडील जास्त होते वाटतं ? आणि आतां अवांतर वाटाघाट ठेव बाजूलाँ आणि चुकून माकून एखादा दागिना घरांत राहिला असेल तो ठेव आणून पुढं—

गीता : हें एवढं एक मणिमंगळसूत्र राहिलं आहे !

तळिराम : मग तेंच दे इकडे,

एवढें म्हणून तळिराम चटकन् पुढें झाला व त्यानें तिच्या गळ्यांतील मंगळसूत्र खसकन् तोडलें व त्यांतील सोन्याचा मणि तेवढा कुरतडून वेऊन तो घराबाहेर पडला ! घरांतून तो जो बाहेर पडला तो थेट क्लबांत—ज्याचें रूपांतर नुकतेंच 'आर्यमदिरामंडळ' नांवाच्या संस्थेंत झालें होतें—येऊन पोहोंचला. मद्यपानाचा प्रसार सर्व धर्मांत व वर्णांत व्हावा व मद्यपान ही अगदीं चहा इतकी नित्याची गोष्ट आर्यावर्तांतील स्त्री-पुरुष, आबाल-वृद्ध जनतेंत व्हावी—या मत-प्रणालीच्या प्रचारार्थ आर्यमदिरामंडळाची स्थापना झाली होती ! मंडळांत तळिराम येऊन पोहोंचण्यापूर्वींच तेथें इतर सदस्य—शास्त्रीबुवा, खुदाबक्ष, मन्याबापू मवाळ, जनुभाऊ जहाल, सोन्याबापू सुधारक, यल्लापा, मगन, रावसाहेब, दादासाहेब वगैरे जमलेले होते. तळिरामाच्या खटपटीनें भगीरथ नांवाचा एक पदवीधर तरुण नुकताच मंडळांत येऊं लागला होता. या सर्व मंडळींनीं आपल्या 'थोर कार्या' ला थोडथोडा आरंभहि केला होता; परंतु मंडळाचा संस्थापक,

मुख्य आधारस्तंभ व निष्ठावंत प्रचारक असा जो तळिराम तो अजूनपावेतों न आल्यामुळें त्यांच्या कार्यक्रमांत अजून तितकासा रंग भरत नव्हता. तळिराम आंत येतांच त्यानें आपल्या नव्या पराक्रमाची—सुधाकराला 'एकच प्याला' दिल्याची हकिगत जेव्हां मंडळींना सांगितली तेव्हां त्या सर्वांनीं तळिरामाच्या नांवानें प्रचंड जयजयकार करून आपल्या कार्याला दुप्पट जोरानें सुरुवात केली.

दिवसेंदिवस सुधाकराचें व्यसन वाढतच होतें. घरांत आळा घालण्यासारखें कोणीच नव्हतें; सनद् रद्द झाल्यानें कामधंद्याचीं माणसें घरीं येण्याचें साहजिकच बंद झालें होतें; त्याच्या व्यसनाच्या वाढत्या बोभाट्यामुळें त्याच्या घरची प्रतिष्ठितांची वर्दळहि बरीच कमी झाली होती. सनद् रद्द झाल्यामुळें तो इतका खचला होता कीं, स्वतंत्रपणें कांहीं लेखनवाचन करण्याचाहि हुरूप त्याच्या मनाला राहिलेला नव्हता. आणि या सर्वांत भर घालण्याकरितां म्हणूनच कीं काय दिवसभर संगतीला तळिराम व रात्रीं आर्यमदिरामंडळाच्या सदस्यांचा गराडा त्याच्या भोंवतीं असे. असें व्यसनोत्तेजक वातावरण चोहोंबाजूंनीं असतांना त्याचें व्यसन दिवसेंदिवस वाढत गेल्यास त्यांत नवल काय ?

मुलगा तीन महिन्यांचा झाल्यावर सिंधु जेव्हां परत घरीं आली तेव्हां सुधाकराच्या एकंदर वर्तनांत पडलेला पालट तिच्या लक्षांत हळूहळू येऊं लागला. तो अलिकडे घरांत पूर्वीसारखा मोकळेपणानें बोलेनासा झाला होता. त्याची विधवा बहिण शरद् हिची चवकशी तो पूर्वीच्या आस्थेनें तर करीत नसेच परंतु खुद्द त्याच्या स्वतःच्या मुलाचेंहि कोडकौतुक करण्याचें तो टाळूं लागला होता. रात्रीच्या वेळीं तो बहुधा घरीं जेवावयास नसेच; कांहीं तरी कामाचें निमित्त सांगून तो खूप उशिरां घरीं येई. त्याच्या वर्तनांतील या वाढत्या तुटकपणाची, तुसडेपणाची जाणीव त्याला करून देण्याचा प्रयत्न सिंधूनें दोनतीनदां केला परंतु तो दर वेळेला कांहींतरी निमित्तें सांगून तिचें म्हणणें अगदींच उडवून लावी. अशा संकटप्रसंगीं तिचा मानलेला भाऊ रामलाल ह्याचें साहाय्य घेण्याखेरीज तिला गत्यंतर नव्हतें. ह्मरी हकिगत त्याला पत्ररूपानें लिहिण्याचा ती विचारहि करूं लागली होती. परंतु तेवढ्यांत अचानकपणें युरोपांत पहिल्या महायुद्धाचा (१९१४–१८)

चणवा पेटल्यामुळें जर्मनीला जाण्याचा बेत रद्द करून रामलाल इंग्लंडमधून मायदेशीं परतला. त्याची गांठ पडतांच सिंधूनें सारा वृत्तान्त त्याच्या कानावर घातला. रामलालनें या प्रकरणांत सुधाकराला तोंडावर कांहीं न विचारतां त्याच्या आसपासच्या माणसांकडून तलास लावण्यास सुरुवात केली. एकदां सिंधु घरांत नाहीं असें पाहून त्यानें गीतेजवळ हा विषय काढला. तिच्या नवऱ्यानें तिला मारहाण करून घरांतून घालवून दिल्यापासून ती अलिकडे सिंधूच्या घरीं राहात असे. तिला थोडी छेडतांच तिनें भडाभडा सारी हकिगत रामलालला सांगून टाकली. आर्यमदिरामंडळाचा पत्ता व त्यांतील सदस्यांचीं तिला माहीत असलेलीं नांवेंहि तिनें त्याला सांगितलीं. त्यांतील भगीरथाचें नांव ऐकतांच रामलाल एक-दम दचकला. बी. ए. च्या परीक्षेंत पहिला आलेल्या या बुद्धिवान् तरुणानें प्रेमभंगामुळें खचून जाऊन पुढील शिक्षण सोडून दिल्याचें व नंतर भ्रमिष्टासारखा तो कोठेंतरी भटकत असल्याचें वृत्त त्याला ऐकून माहीत होतें; एवढेंच नव्हे तर तो त्याच्या थोड्या फार परिचयाचाहि होता. गीतेनें सांगितलेली हकिगत ऐक-तांच रामलाल तडक भगीरथाकडे गेला. भगीरथ बाहेर पडण्याच्या बेतांत होता. रामलालसारखा मोठा मनुष्य घरीं आल्यामुळें त्याला फार आनंद झालेला दिसला. प्रारंभींचें आगतस्वागत झाल्यावर औपचारिक गप्पांना टाळा देऊन राम-लालनें एकदम मुख्य विषयालाच हात घातला.

रामलाल : भगीरथ, मी तुमच्याकडे आलों आहें एका कामासाठीं. हवापाण्याची प्रस्तावना केल्यावांचून एकदम सरळपणानं आणि मोकळ्या मनानं बोलायचं आहे तें बोलूं का ?

भगीरथ : अगदीं खुशाल बोला !

रामलाल : पहा, मग लपवा छपवी करूं लागाल ! नाहीं ना ? बरं तर मग, आज संध्याकाळीं आम्हांलाहि तुमच्या 'आर्यमदिरामंडळां' त दाखल करून घ्या ना. अंहं, असे चकित होऊं नका ! मला सर्व कांहीं ठाऊक आहे ! तशी मला एक-थ्यालासुद्धां जायला हरकत नाहीं; पण माहितगारामार्फत शिरकाव झालेला बरा ! माझे एकदोन मित्रहि आहेत त्यांत ! पण संकोचामुळं कोणी कबूल व्हायचं नाहीं.

तेव्हां सर्वांची विमानं वर चढल्यांवरच गांठी पडलेल्या बऱ्या !
भगीरथ : डॉक्टर, तुम्ही या पंथांतले आहांत ? मला नाहीं खरं वाटत !
रामलाल : पूर्वी नव्हतों, पण परदेशगमन करून ही विद्या शिकून आलों झालं ! तिकडच्या थंड प्रदेशांत या भानगडींवांचून चालत नाहीं ! इथं आल्यापासून मोकळेपणानं घेण्याची जरा पंचाईत पडूं लागली आहे, तेव्हां हा मार्ग हुडकून काढला ! करालना एवढं काम ?
भगीरथ : ठीक आहे, चला मग आतांच !
रामलाल : अगदीं सुरवातीपासूनच नको. मंडळी रंगांत आली म्हणजे गेलेलं बरं ! म्हणजे दुसऱ्याला संकोच नाहीं, आपल्यालाहि संकोच नाहीं !

आणि मग इकडे तिकडे भटकण्यांत बराच वेळ घालवून ते दोघे रात्रीं बाराच्या सुमाराला आर्यमदिरामंडळांत जाऊन पोहोंचले. त्यांच्या अपेक्षेप्रमाणें खरोखरच मंडळाच्या सदस्यांचीं 'विमानें चिक्कार वर चढलेलीं' असून तेथून अकलेचे तारे तोडण्यांत त्यांच्यांत अहमहमिका चालू होती ! सुधाकराला मध्यें बसवून सारेजण त्याला अधिक पिण्याचा आग्रह करीत होते. सुधाकर त्या वेळीं इतका प्यायला होता कीं, त्याला धड बसणेंहि अशक्य झालें होतें. त्याला त्या स्थितींत पाहून रामलाल मनांत चरकलाच. भगीरथाला खुणावून तो त्यासह आड बाजूला उभा राहून मंडळींचें संभाषण लक्षपूर्वक ऐकूं लागला.
खुदाबक्ष : सुधाकरसाहेब, घ्याना थोडी !
सुधाकर : मला नको आतां खांसाहेब !
बापूसाहेब : घ्या हो सुधाकर ! उद्यां तुमची सनद तुम्हांला परत मिळणार आणि आज तुम्हीं असं चोरटं काम चालविलं आहे !
सुधाकर : हुसेन, आण बाबा तो पेला ! आतां मात्र हा शेवटचा हं !
तळिराम : तें कांहीं नाहीं दादासाहेब, तुम्ही उद्यां त्या मुन्सफसाहेबांच्या नाकावर टिच्चून दारु पिऊनच कचेरींत हजर व्हा !
सुधाकर : हो ऽ हो ऽ ऽ ! मी पिऊनच कचेरींत जाणार ! हिंमत आहे आम्हांसी !
जनभाऊ : शाबास, जरूर दारु पिऊन जा !

रावसाहेब : सुधाकरपंत, तुम्ही आम्हांला पाठच्या भावासारखे ! तुमच्या जिवा-साठीं जीव देऊं ! दारू पिऊनच कचेरींत जा ! मग सनद कायमची रद्द झाली तरी हरकत नाहीं ! तुम्हांला वाटेल तितक्या नोकऱ्या देऊं !

मगन : सुधाकर, आतां माघार घ्यायची नाहीं.

सुधाकर : माघार घ्यायची मला हिंमत नाहीं ! मी आतां कचेरींत जायला तयार आहे !

खुदाबक्ष : बस्स, बस्स, शास्त्रीबुवा ! आतां असंच करायचं कीं, सर्वांनीं उद्यां कचेरीची वेळ होईपर्यंत असं सारखं पीत रहायचं आणि सुधाकराला तसाच कचेरींत पोहोंचवायचा !

तळीराम : हुसेन, दादासाहेबांना दे एक प्याला आणखी !

आणि मग मंडळींच्या पिण्याला अगदीं सुमारच राहिला नाहीं. चढत्या निशेबरोबर त्यांच्या संभाषणांतील विसंगतीहि वाढत चालली होती. दारु अति चढल्यामुळें कोणी नाचूं लागले होते, कोणी गडबडा लोळत होते; तर कोणी ओक्साबोक्शीं रडत होते ! मन्याबापू आपण स्वतः व आपले जमलेले सहकारि दारु प्यायले आहेत हें विसरून मद्यपानाविरुद्ध घोषणा करूं लागला होता !

मन्याबापू : दारु ही खराब चीज आहे ! दारु ही भिकार वस्तु आहे ! दारु ही वाईट गोष्ट आहे !

जनुभाऊ : मन्या, काय बडबडतो आहेस हें ?

मन्याबापू : मी चळवळ करतों आहे ! मद्यपाननिषेध करतों आहे !

जनुभाऊ : मन्या, निषेध करूं नकोस, मद्यपान कर !

मन्याबापू : दारु हें मद्यपान आहे, दारु हा निषेध आहे, दारु ही चळवळ आहे, दारु अशुद्ध आहे !

जनुभाऊ : मन्या, मन्या, संभाळ भडकत चाललास ! तीर्थोदकं च वान्हिश्च नान्यत : शुद्धिमर्हत : ! वहातं पाणी किंवा अग्नि हीं जात्या शुद्ध असतात.

दारूचा प्रचंड ओघ चारी खंडांत वहातो आहे आणि तिच्या पोटीं आग आहे. दारु दुहेरी शुद्ध आहे, हें धर्मवचनावरून सिद्ध होत आहे.

मन्याबापू : दारूमुळं आपआपसांत कलह माजतात—तंटे माजतात.

जनुभाऊ : मन्या ! नरडं दाबून जीव घेईन आतां. दारूमुळं जन्माचीं वैरं संपतात. तिच्या दरबारांत आग आणखी पाणी सलोख्यानं संसार करतात !

मन्याबापू : दारूमुळं मनुष्य असंबद्ध बडबडूं लागतो !

जनुभाऊ : साफ खोटं आहे हूं ! मी मघापासून असंबद्ध बडबडतों आहे ?

मन्याबापू : तूं मुळींच असंबद्ध बडबडत नाहींस. मी खरंच बडबडतों आहे, दारु वाईट आहे, असं मी बडबडतों आहे.

जनुभाऊ : मुळींच नाहीं ! दारु चांगली आहे, असं तूं म्हणतोस आहेस. दारु वाईट आहे, असें कबूल करतोस कीं नाहीं, बोल—

मन्याबापू : नाहीं म्हणायचा तसं ! दारु चांगली आहे ! !

शास्त्रीबुवा : अरे, बोलण्याच्या गडबडींत तुम्हीं आपल्या बाजू बदलून लढत आहांत !

जनुभाऊ : असं का ? ठीक आहे ! चल मन्या, पुन्हां आपापल्या बाजू घेऊन पहिल्यापासून लढूं !

आणि मग लढण्याऐवजीं जनुभाऊ-मन्याबापू एकमेकांच्या गळ्याला मिठ्या मारून मोठमोठ्यानं ओक्साबोक्शीं रडूं लागले !

इतका वेळ शांतपणें हे सारे त्यांचे प्रलाप ऐकत उभ्या असलेल्या रामलालला आतां तें अधिक ऐकणें अगदीं अशक्य झालें. तो भगीरथाला म्हणाला, "भगीरथ, पहा या कंगालांचा किळसवाणा प्रकार ! पुरे झाला हा प्रसंग आतां !

भगीरथ : रोज सुरुवातीपासून त्यांच्याबरोबर पीत गेल्यामुळं हा सर्वस्वीं निंद्य प्रकार कधींहि माझ्या लक्षांत आला नाहीं !

रामलाल : भगीरथ, पहा या प्रेतांकडे ! यांच्याबरोबर तुम्ही दारू पिऊन बसतां ! हतभागी महाभागा, तूं ताज्या रक्ताचा तरुण आहेस, तीव्र बुद्धीचा आहेस, थोर अंतःकरणाचा आहेस—आणि म्हणूनच तुझ्यासाठीं अंतरात्मा तळमळून मी

बोलतों आहे. संसारांत प्रेमभंग झाला म्हणून तूं या दारूच्या व्यसनाकडे वळलास ? एकोणीसशें मैल लांबीचा आणि अठराशें मैल रुंदीचा, नाना प्रकारच्या आपदांनीं भरलेला, हजारों पीडांनीं हैराण झालेला, तुझा स्वदेश तेहतीस कोटी केविलवाण्या किंकाळ्यांनीं तुला हांका मारीत असतांना, प्रेमभंगामुळं अनाठायीं पडलेलं जीवित सार्थकीं लावायला तुला दारूखेरीज दुसरा मार्गच नाहीं सांपडत का ? पाणिग्रहणावांचून रिकामा असलेला तुझा हात—भगिरथा, जन्मदात्री स्त्रीजात गुलामगिरींत पडली आहे, लक्षावधि निरक्षर शूद्र ज्ञानप्राप्तीसाठीं तळमळत आहेत, साडेसहा कोटी माणसांसारखीं माणसं नुसत्या हस्तस्पर्शासाठीं तळमळत आहेत, या बुडत्यांपैकीं कुणाला तरी हात दे—

भगीरथ : रामलाल, आज माझा पुनर्जन्म झाला आहे. मी अजाण आहें—रस्ता चुकलों आहें. यापुढं मला मार्गदर्शक व्हा. आजपासून हा भगीरथ या भारतमातेच्या सेवेला वाहून घेणार.

शास्त्री : भगीरथ, काय गडबड आहे ? तळिराम, भगिरथाला दे.

भगिरथ : मित्रहो, माझ्याकरितां हे कष्ट घेऊं नका. आजपासून हा भगीरथ तुम्हांला आणि तुमच्या या दारूला पारखा झाला !

तळिराम : भगीरथ, काय भलतंच मांडलं आहेस हें ? अरे मंडळींच्या आग्रहाखातर-फार नको, फक्त एवढा-एकच प्याला ! बस्स एकच प्याला !

परंतु तळिरामानें पुढें केलेला प्याला ताडकन् लाथेनें उडवून देऊन भगीरथ रामलालसह आर्यमदिरामंडळाबाहेर पडला !

दुसऱ्या दिवशीं सुधाकर खरोखरच मद्यपान करून कोर्टांत गेला. निशा अतिशय चढल्यामुळं त्याच्या बोलण्याला कांहीं सुमारच राहिला नाहीं. कोर्टांतील पट्टेवाल्यापासून थेट मुन्सफापर्यंत वाटेल त्याला तो वाटेल तें बोलूं लागला. कांहीं वकीलमंडळींनीं त्याला थोपविण्याचा प्रयत्न केला; परंतु त्यामुळें उलट अधिकच भडकून जाऊन तो त्यांच्यावरच घसरला. या त्याच्या गैरवर्तणुकीचा शेवटीं व्हायचा तोच परिणाम झाला. मुन्सफानें त्याची सनद कायमची रद्द केल्याचें जाहीर केलें व त्यास कोर्टांतील शिपाई-पट्टेवाल्याकडून धक्के मारून इमारतीबाहेर

काढलें ! त्याला टांग्यांत घालून तळिराम घरीं घेऊन आला. सिंधूला कोर्टांतील हा सारा प्रकार जेव्हां कळला तेव्हां दुःखातिशयानें झीट येऊन ती एकदम खालींच कोसळली. सिंधु बेशुद्ध होऊन पडली तरी सुधाकर शुद्धीवर येण्याचें लक्षण दिसेना. उलट त्याचें अद्वातद्वा बरळणें व त्याच्या जोडीला पिणें दुप्पट जोरानें चालू झालें होतें. शरदनें व तिला शिकविण्याकरितां म्हणून आलेल्या भगीरथानें त्याची कशीबशी समजूत घालून त्याला आंतल्या खोलींत नेऊन निजविलें. गीतेनें चटकन् रामलालला बोलावून आणलें. रामलालनें घरांत पाऊल टाकतांच प्रथम सिंधूला शुद्धीवर आणलें. परंतु शुद्धीवर येतांच सिंधु पुन्हां त्याच्या गळ्यांत पडून ओक्साबोक्शीं रडूं लागली. रामलाल तिची कशीबशी समजूत घालीत तिला म्हणाला, "ताई, हें बघ तूंच जर असा धीर सोडलास तर यांतून कधींच मार्ग निघायचा नाहीं. आणि तुझ्या लक्षांत आहेना—आज दुपारच्या गाडीनें तुझा पद्माकरदादा आणि बाबासाहेब यावयाचे आहेत ते ?—चल, तर मग, ऊठ आधीं. हा पसारा आवर सारा. तोंपर्यंत मी सुधाकराची निशा उतरवण्याचा प्रयत्न करतों." एवढें बोलून व गीतेला सिंधुकडे लक्ष देण्यास सांगून तो तडक सुधाकराच्या खोलींत गेला. तिथें तळिरामाला पाहातांच त्याचा राग अनावर होऊन तो एकदम त्यावर ओरडला, "तळिराम, आधीं असाच्या असा चालता हो पाहूं ! इतःपर या घरांत पाऊल टाकशील तर खबरदार !"

तळिराम : दादासाहेब, हे रामलाल बघा काय म्हणतात !

सुधाकर : कोण रामलाल ? माझ्या घरांत कुणाची छाती आहे तुला कांहीं म्हणायची ?

तळिराम : छाती आहे म्हणून तर तुमच्या नाकावर टिच्चून मला घरांत येण्यास बंदी करत आहेत ! आम्ही तुमचे जिवाचे दोस्त—आम्हांला घरांत यायची बंदी !

सुधाकर : मी रामलालाच बंदी करतों. रामलाल, पाऊल टाकूं नकोस यापुढें घरांत ! घर माझं आहे !

तळिराम : तुमचें ऐकतो कोण ? बाईसाहेब त्यांना अनुकूल, शरदिनीबाई त्यांना अनुकूल ! सगळ्यांनीं संगनमत करून आज पद्माकराला तार केली आहे. तो

येऊन तुमचा बंदोबस्त करणार ! आतां आम्हांला धक्का मारून बाहेर घालविणार !

सुधाकर : सगळे पाजी, चोर, हरामखोर लोक आहेत ! येऊं दे, पद्माकर येऊं दे, नाहीं तर त्याचा बाप येऊं दे ! पद्माकर, त्याचा बाप, रामलाल, शरद्, सिंधु— एकेकाला लाथ मारून हांकलून देतों घराबाहेर !

तळिराम : ते लोक बरे जातील ? तुमची सनद् गेल्यापासून गेले सहा महिने पद्माकर तर खर्च चालवितो आहे तुमचा; तो कसा जाईल ? पैसा त्याचा आणि घरहि त्याचं !

सुधाकर : मला कुणाची कवडी नको आहे ! मी लाथ मारीन तिथं पाणी काढीन ! मला कुणाचा पैसा नको आहे ! मला थोडीशी दारु पाहिजे ! आणि थोडीशी !

तळिराम : या घरांत तुम्हांला घेतांना पाहिलं तर बाईसाहेब काय म्हणतील मला?

सुधाकर : काढ पेला ! सिंधूच्या, शरद्च्या देखत भरून दे ! कुणी इथं अक्षर बोललं तर पाहतों ! सिंधु, शरद्, सिंधु चलाव ! सगळे इकडे या—चलाव ! सिंधु, शरद् ! तळिराम, भर पेला !

त्याच्या हांका ऐकून सिंधु व शरद् खोलींत आल्या. तळिराम सुधाकराला दारु देत असलेला तिला दिसला. ती भावनातिरेकानें एकदम ओरडून तळिरामाला म्हणाली, "तळिराम, तळिराम, काय करतां हें ?"

सुधाकर : एक अक्षर बोलूं नकोस ! मुकाट्यानं दोघी उभ्या रहा, आणखी पहा ! तळिराम, आण इकडे तो पेला !

शरद् : तळिराम, तूं अगदीं नरपशु आहेस ! दोन्ही डोळ्यांचो भीड—मुरवत, लाज—लज्जा कांहींतरी आहे का तुला ?

तळिराम : दादासाहेब, तुमच्या बायका आम्हांला शिव्या देतात; ऐका !

सुधाकर : सिंधु, शरद्, लाथ मारीन एकेकीला !

तळिराम : माझ्या बायकोच्या गळ्यांतलं मी मंगळसूत्रसुद्धां तोडलं ! पण दादासाहेब, तुमच्या बायकांनीं आम्हांला खेटरं दिलीं, शिव्या दिल्या ! बायकोच्या गळ्यांतलं मंगळसूत्र तोडणारा मर्द मी !—

सुधाकर : सिंधूच्या गळ्यातलं मंगळसूत्र तोड ! ऊठ, तळिराम, माझी तुला शपथ आहे ! तूं माझा दोस्त आहेस ! जिवाचा कलिजा आहेस ! माझा भाऊ आहेस ! बाप आहेस ! ऊठ, सिंधूच्या गळ्यांतलं मंगळसूत्र तोड ! शरद्च्या गळ्यांतलं तें तोड ! ऊठ, मंगळसूत्र तोड आणि मग माझं जानवंही तोड !

शरद् : दादा, दादा, काय हा अविचार ? अरे, हें तूं मांडलें तरी आहेस काय ?

सिंधु : देवा, भाई—

सुधाकर : हं, खबरदार, हलूं नका जागच्या; नाहींतर मान कापीन ! रामलाल-भाईचं नांवसुद्धां यापुढं घ्यायचं नाहीं ! तळिराम बघतोस काय ? तोड तीं मंगळसूत्रं !

तळिराम खरोखरीच जागचा उठला. अति प्यायल्यामुळं त्याचे पाय स्थिर रहात नव्हते; तरीहि तसाच झोके खात खात तो सिंधूजवळ गेला व तिच्या गळ्यांतील मंगळसूत्र ओढूं लागला. परंतु तेवढ्यांत अचानकपणें तिचा भाऊ पद्माकर व वडील बाबासाहेब हे तिथें येऊन पोहोंचले. तळिराम करीत असलेला अतिप्रसंग पाहातांच पद्माकर एकदम इतका भडकला कीं त्यानें त्या भरांत तळि-रामला लाथेनें दूर उडवून दिला. इतरांनीं त्याला आवरला नसता तर तळिराम त्याच्या लाथांनीं त्या दिवशीं बेशुद्धच पडला असता !

पद्माकर : बेशरम, निर्लज्ज जनावरा, तुला उभा चिरून टाकतों ! आधीं चालता हो या घरांतून !

सुधाकर : तूंच चालता हो आधीं या घरांतून ! त्या थेरड्यांना एक लाथ मारा ! चले जाव ! तळिराम, लगाव लाथ एकेकाला ! पाजी लोक !

पद्माकर : दादासाहेब, आपण हें मांडलं आहे तरी काय !

सुधाकर : चल जाव, पद्माकर. रामलाल, आधीं तूं निघ ! सिंधूशीं संगनमत करतोस माझ्या घरांत !

तळिराम : तुमची सनद् गेली त्या वेळीं यानें बाईसाहेबांना मिठी मारली !

पद्माकर : हरामखोर ! जिव्हा छाटून टाकीन एक अक्षर बोललास तर !

तळिराम : दादासाहेब, म्हणून यानं मला परत घरांत यायची बंदी केली !